स्वा. वा. श्रीमंत भालचन्द्रराव अण्णासाहेब पटवर्धन बी. ए.
कुरुन्दवाड संस्थानचे अधिपति ( सीनियर ) यांचे
पुण्यस्मरणार्थ स्थापन झालेली

भालचन्द्र-ग्रन्थमाला

पुष्प १६ वें

---

# नव्या पतिव्रता !



[ एक मनोरंजक, सामाजिक कादम्बरी ]



" माता भूमिः पुत्रोऽहं पृथिव्याः । "—अथर्ववेद. १२।१

" नमो मात्रे पृथिव्यै । नमो मात्रे पृथिव्यै ।—यजु. ९।२२

---

लेखक :

गणेश कृष्णशास्त्री फाटक

---

१९३९

प्रथमावृत्ति ] [ मूल्य १॥ रुपया

प्रकाशक :
नारायण कृष्णशास्त्री फाटक,
वाग्विहारमन्दिर, कुरुन्दवाड.



मालेचीं पुढील पुष्पें

१
वातचक्र !
२
श्रीमन्त !
३
कांटेरी कुम्पण !
४
हिन्दुधर्माचे हाडवैरी !
५
स्टेट कॉंग्रेस !

पत्ताः—स्वर्गसाम्राज्य पुस्तकालय,
कुरुन्दवाड (स्टेट)

मुद्रक :
वासुदेव नारायण ठकार,
श्रीसिद्धेश्वर प्रिं. प्रेस, कोल्हापूर.

# अवतरणिका



भालचन्द्रग्रन्थमालेचें हें सोळावें पुष्प माझ्या प्रिय वाचकांच्या हातांत देतांना मला अतिशय आनन्द होत आहे. भालचन्द्रग्रन्थमाला सुरू झाली व चालू पुष्पापर्यन्त तिनें मजल मारली, याचें सर्व श्रेय श्रीमन्त, मातुश्री माईसाहेब पटवर्धन, कुरुन्दवाड सीनियर स्टेटच्या रीजण्ट-साहेब यांच्याकडेच आहे. त्यांची हार्दिक अर्थात् सक्रिय सहानुभूति जर नसती, तर माझ्यासारखा, आर्थिक दृष्टीनें अकिंचन असणारा, एक साहित्याचा सामान्य सैनिक काय करणार होता ? आनन्दाची गोष्ट कीं, श्रीमन्त मातुश्रींच्या प्रमाणें आमचे तरुण राजे श्रीमन्त बाळासाहेब महाराज यांनाही वाङ्मयाची आवड असून, त्यांच्या उदार अन्तःकरणांत साहित्यसेवकांबद्दल अत्यन्त प्रेमादर वसत आहे. परमेश्वर करो आणि श्रीमन्तांना चिरायुरारोग्य प्राप्त होऊन श्रीहर्ष, भोजराज इ. प्राक्कालीन नृपतींच्या प्रमाणें ते विद्वानांचा उत्तरोत्तर अधिकाधिक परामर्श घेवोत.

माझ्या विनन्तीला मान देऊन श्रीमन्त, मातुश्री गंगाबाईसाहेब पटवर्धन यांनीं, आपले प्रिय पति, कुरुन्दवाड ज्यु. स्टेट नं. २ चे अधिपति, स्वा. वा. श्रीमन्त नानासाहेब महाराज पटवर्धन यांचा सुबक फोटो ब्लॉक करण्याकरितां माझ्या स्वाधीन केला व त्यांच्याबद्दल चार शब्द लिहिण्याची मला परवानगी दिली, याबद्दल त्यांचे अत्यन्त उपकार आहेत.

प्रस्तुत कादम्बरी ' नव्या पतिव्रता ! ' ही मी केवळ मनोरंजनाकरितां लिहिली आहे. आतां त्यांतून कांहीं उपदेश, तत्त्व किंवा दिग्दर्शन निघणारच नाहीं असें नाहीं. पण तो प्रमुख उद्देश नाहीं. ' कलेकरितां कला ' या तत्वाचा मी उपासक नसून ' जीवनाकरितां कला ' हें तत्त्व मला

प्रिय व मान्य आहे. आत्तांपर्यंत ‘ जयजयकार ’ ‘ देशाचे ज्ञानदीप ’, ‘ कुऱ्हाड ’, ‘ अनाथांचा नाथ! ’, ‘ ढोंगी गुरूच्या सैतानी लीला! ’, ‘ हद्दपार! ’ इ. कादम्बऱ्या मी केवळ तत्त्वाकरितां अर्थात् प्रचारात्मक लिहिल्या व पुढेंही ‘ श्रीमन्त! ’, ‘ हिन्दुधर्माचे हाडवैरी! ’, ‘ असह्य आग! ’ इ. माझ्या कादम्बऱ्या प्रसिद्ध होतील, त्याही याच धोरणानें लिहिलेल्या आहेत. केवळ ‘ वीरात्मा ’ व ‘ नव्या प्रतिव्रता ’ या दोनच माझ्या कादम्बऱ्या माझ्या नेहमींच्या धोरणाला अपवाद आहेत. प्रस्तुत मनोरंजक बृहत्कथा संसारतापानें त्रस्त झालेल्या, श्रमलेल्या, भागलेल्या जिवाला पुन्हां टवटवीत करील असा विश्वास वाटतो.

माझ्या विनंतीला मान देऊन ‘ किर्लोस्कर ’ मासिकांचे सुप्रसिद्ध, तरुण चित्रकार श्री. शं. तु. माळी यांनीं मुखपृष्ठाकरितां अतिशय सुन्दर चित्र, अतिशय त्वरेनें तयार करून दिलें, याबद्दल त्यांचे उपकार मानावेत तेवढे थोडेच आहेत.

श्रीसिद्धेश्वर प्रेसचे मालक श्री. आणासाहेब ठकार यांनीं या कादम्बरीची छपाई किती मोहक व किती आपुलकीनें केली आहे, याचा पुरावा वाचकांच्या हातांत प्रत्यक्षच आहे. माझे व श्री. आण्णासाहेबांचे सम्बन्ध निवळ व्यापारी नसून, त्यांत सौहार्दाची आर्द्रताही आहे; आणि म्हणूनच मला माझें प्रकाशन अतिशय सुखकर होत आहे. मी त्यांचा आजन्म ऋणी आहें, हें आतां निराळें सांगावयास पाहिजे काय? इत्यलम् पल्लवितेन!

| | |
|---|---|
| वाग्विहार मंदिर,<br>कुकडवाड–ता. २१।८।३९ | रसिकांचा नम्र सेवक,<br>गणेश कृष्णशास्त्री फाटक. |

स्वा. वा. श्रीमंत विनायकराव नानासाहेब पटवर्धन
कुरुन्दवाड ज्यु. संस्थान नं. २ चे अधिपति, यांची

# पुण्यस्मृति



## तो भयंकर दिवस!

तो शा. श. १८५४ भाद्रपद शु. एकादशीचा भयंकर दिवस, तो कुरुन्दवाडस्थ लोकांच्या काळजाचें पाणीपाणी करून, त्यांच्या नेत्रावाटे अश्रुरूपानें वाहविणारा भीषणतम दिवस आम्ही विसरणें शक्य नाहीं. त्या दिवशीं नित्याप्रमाणेंच अरुणोदय झाला, पण त्यांत चैतन्य नव्हतें. उषादेवीही सूर्यनारायणाचें स्वागत करण्याकरितां सिद्ध झाली, पण तिच्यांत उत्साह नव्हता. मन्द व शीतल वायु वाहत होता, पण त्यांत जीव नव्हता. आकाशांत, वृक्षावर पक्षी गान करीत होते, पण आज त्यांच्या गाण्यांत करुणस्वरांचें मिश्रण झालें होतें. फुलें, वेली यांनीं तर टवटवीतपणाचें नुसतें सोंग आणलें होतें. यानन्तर सूर्यनारायणाची स्वारी उदयित झाली, पण आज त्याच्याजवळही रोजचें तें तेज नव्हतें!—आज असें कां बरें व्हावें? आज साऱ्या सृष्टीनें म्लान व्हावें, असें काय अशुभ, असें काय भयप्रद, असें काय भयंकर होणार होतें?— होय! तसेंच बलवत्तर कारण होतें आणि म्हणूनच भविष्यज्ञानी सृष्टीनें खिन्नवदन केलें होतें! आज प्रातःकालीं बरोबर सव्वा सात वाजतां

### आमचा सौभाग्यसूर्य

अस्तंगत व्हायचा होता! आजच्या पुण्यपावन दिवशीं आम्हा

सर्वांचा बहिश्चर प्राण परमेश्वरस्वरूपांत विलीन व्हायचा होता! आमच्या जिवाचा कलिजा आम्हांला पुन्हां दिसायचा नव्हता! आणि तसेंच झालें! याच एकादशीच्या पवित्र दिवशीं स्वजनांना दुःखसागरांत लोटून, कुरुन्दवाड ज्यु. संस्थान नं. २ चे अधिपति श्रीमन्त विनायकराव नानासाहेब पटवर्धन यांनीं इहलोक सोडला!! एकादशीचा पुण्यदिन पुण्यमय श्रीमन्तांनीं साधला, हें त्यांच्या दृष्टीनें योग्यच झालें, पण तें अवेळीं झालें! वेळेवर गोष्टी झाल्यावर त्याला नांवें कोण ठेवील आणि दुःख तरी कोण करील? पण काळानें हा डाव अवेळीं साधल्यामुळें आमचीं अन्तःकरणें कशीं चिरलीं गेलीं, हें त्या निर्दयाला कसें कळणार!

## कुरुन्दवाड स्टेटमध्यें

सीनियर व ज्युनीयर असे दोन भाग आहेत. पुन्हां ज्युनियरमध्यें नम्बर १ व नम्बर २ असे दोन विभाग आहेत. त्या नं. २ चे स्वा. वा. नानासाहेब हे अधिपति होत. श्रीमन्तांचा जन्म शा. श. १७९९ चैत्र शु. १३ या दिवशीं झाला. व अवसान शा. श. १८५४ भाद्रपद शु. ११ स झालें. म्हणजे अवघीं ५३॥ वर्षेंच त्यांनीं या लोकीं वास्तव्य केलें! वयाच्या ३४ व्या वर्षी त्यांना पितृवियोग झाल्यानन्तर सर्व

## सांसारिक भार

त्यांच्या शिरावर पडला. आणि हीच वेळ त्यांच्या आयुष्यांत अतिशय आणीबाणीची होती. कारण श्रीमन्तांचे वडील असेपर्यन्त श्रीमंतांसुद्धा पांची बन्धु आपल्या परिवारासह एकत्र व आनन्दानें राहत होते ते आपल्या तीर्थरूपांचें व्यक्तिमत्व व दूरदर्शी धोरण, यामुळें असें म्हणतां आलें असतें; पण श्रीमन्तांच्या स्वभावाची खरी परीक्षा त्यांना पितृवियोग झाल्यानन्त-

रच, अर्थात् त्यांनीं आपला, सपरिवार संसार हातांत घेतल्यानंतरच झाली. खरोखर श्रीमन्तांचें एकत्र कुटुम्ब म्हणजे

## मूर्तिमन्त गोकुळ

होतें. दुर्दैवानें श्रीमन्त अनपत्य होते. (मुंबईचे विख्यात कै. डॉक्टर गोपाळ शिवराम वैद्य यांची कन्या, हें श्रीमन्तांचें पहिलें कुटुम्ब होय. त्यांना त्यांपासून एक कन्या झाली होती व ती बरेलीचे अमृतराव पेशव्यांचे वंशज श्रीमन्त बापूसाहेब पेशवे यांना दिली होती; परन्तु तीं दोघेंही दैवगतीनें अल्पायु ठरलीं आणि पहिल्या राणीसाहेब तर त्यांच्या आधींच कैलासवासी झाल्या होत्या!) परन्तु तें दुःख मनाला लावून न घेतां ते आपल्या बन्धूंचीं मुलें तीं आपलींच मुलें या भावनेनें त्यांनीं व त्यांच्या विद्यमान, सच्छील राणीसाहेब श्रीमन्त, मातुश्री गंगाबाईसाहेब यांनीं त्यांच्यांकडे पाहिलें व आपल्या पोटच्या पोरांप्रमाणें त्यांचें लालनपालन केलें. संस्थानांमध्यें नेहमीं अशी पद्धति असते कीं, नवा राजा गादीवर बसला कीं, त्यानें बहुतेक जुन्या नौकरांची हकालपट्टी करावयाची व आपल्याला प्रिय असतील त्यांची वर्णी लावायची; परन्तु श्रीमन्तांनीं मात्र आपल्या वडिलांच्या वेळच्या एकाही नौकराला कमी केलें नाहीं; इतकेंच नव्हे तर ते आपल्या नौकरांनाही आपल्या कुटुम्बाचे घटक समजत. त्यामुळें नौकरांतही आपलेपणा उत्पन्न होत असे. याच धोरणानें ते आपल्या प्रजेशींही वागत. म्हणून त्यांना जनतेनें

## धर्मराज

अशी स्वयंस्फूर्तीनें पदवी अर्पण केली होती; आणि हीच पदवी खरीखुरी नाहीं काय? ते अत्यन्त प्रेमळ, पापभीरु व आनन्दी होते; मनाचे अतिशय कोमल व दयाळू होते; कर्मठ होते व

श्रीगणपतिभक्त तर पहिल्या प्रतीचे होते. त्यांनीं आपल्या आयुष्यांत कोणाचेंही अहित केलें नाहीं आणि त्यामुळेंच अजूनही त्यांच्यांशीं ज्यांचा ज्यांचा सम्बन्ध आला, ते लोक हळहळत आहेत. त्यांचें बन्धुप्रेम अलौकिक होतें, यांत शंका नाहीं. त्यांचे तिसरे कनिष्ठ बंधु

## श्रीमन्त आप्पासाहेब

यत्त्यांवर तर त्यांचें निरतिशय प्रेम होतें. मृत्यूपूर्वी सुमारे १२, १४ वर्षें श्रीमन्तांनीं, विद्यमान श्रीमन्त आप्पासाहेब यांच्यांवरच सर्व कारभार सोपविला होता. पण त्यांच्या औदार्याचा अधिक फायदा न घेतां, श्रीमंत आप्पासाहेब हे श्रीमन्तांना विचारूनच सर्व गोष्टी करीत असत. श्रीमन्तांनीं सहकुटुंब सर्व तीर्थयात्रा केल्या. त्या वेळीं त्यांनीं श्रीमंत आप्पासाहेब यांना बरोबर नेलें होतें. त्यांनीं आपलें सर्व प्रवासवृत्त 'मनोरंजन' मधून प्रसिद्ध केलें आहे.

श्रीमन्त, राजे, सर बाळासाहेब महाराज पटवर्धन, के.सी.आय. ई. मिरज संस्थानचे अधिपति यांचें व इतर संस्थानिकांचेंही कै. श्रीमन्तांच्यावर अतिशय प्रेम असे. मिरज संस्थानचे युवराज श्रीमंत तात्यासाहेब, त्यांचे कनिष्ठ बंधु श्रीमन्त दादासाहेब व श्रीमन्त बाबासाहेब आम्बेगांवकर जहागीरदार हे कै. श्रीमंतांचे सख्खे मावसबन्धु होत.

## श्रीमन्तांची निशाणबाजी

अप्रतिम होती. झाडाला लवंग बान्धून ती बन्दुकीच्या गोळीनें उडवीत असत! त्यांची घोड्यांवरची माण्डही कणखर होती. त्यांचा 'चेण्डु' म्हणून घोडा होता. तो श्रीमन्त किंवा त्यांचा चाबूकस्वार यांच्याशिवाय कोणाला अंगाला हातही लावूं देत नसे.

श्रीमन्तांनीं घोड्यावर बसून व हातांत भाला घेऊन मस्त हत्तीला खेळविलेलें मी स्वतः पाहिलें आहे. त्यांचा 'टेनी' नांवाचा एक सुन्दर टेरियर जातीचा कुत्रा होता. त्याच्यावर त्यांचें इतकें प्रेम होतें कीं, त्याच्या मृत्यूनन्तर त्यांनीं 'विनायक बाग मळया' मधें त्याची समाधि बान्धली!

## राणीसाहेब

श्रीमन्तांच्या द्वितीय राणीसाहेब या हरिपुरचे कै. भास्करराव लागू यांच्या कन्या होत. श्रीमन्तांचें सुदैव म्हणूनच त्यांना अत्यन्त प्रेमळ, पतिहिततत्पर व सदाचारिणी अशी ही सहचारिणी लाभली. श्रीमन्तांच्या हयातींत त्यांनीं त्यांची नमुनेदार सेवाशुश्रुषा केली आणि पतिवियोगानन्तरही मातुश्रींनीं आपली परमेश्वरावरील अढळ श्रद्धा ढळूं न देतां, आपल्या परिवाराला धीर देऊन, अवधान राखलें, याबद्दल त्यांची प्रशंसा करावी, तेवढी थोडीच आहे!

## श्रीमन्तांना अधिकारप्राप्ति

झाल्यानन्तर त्यांना तिचा उपभोग मात्र ७।८ महिन्यांपेक्षां अधिक घेतां आला नाहीं. कारण श्रीमन्त लागलीच अर्धांगानें आजारी पडले व शेवटीं त्यांतच त्यांचें अवसान झालें!! अशा या पुण्यपुरुषाच्या पवित्र स्मृतीवर आम्ही हें आमचें कादम्बरी पुष्प स्वामिभक्तिपूर्वक अर्पण करीत आहोंत!

श्रीमन्तांचा नम्र आश्रित

गणेश कृष्णशास्त्री फाटक.

भालचन्द्र ग्रन्थमालेचें

पुढील कादम्बरी पुष्प



# वातचक्र !



लेखक :

श्री. ना. धों. उपाध्ये

' अभागिनीची डायरी !'

या कादम्बरीचे कर्ते

## : १ : पत्नीचें प्रशंसापत्र

सुरेखा आज सबंध रात्रभर जागी होती. कारण रात्रीचे अकरा वाजले, बारा झाले, एकाचा ठोका पडला, शेवटीं चारीचा गजर झाला, तरी तिच्या पतीचा—सर्वोत्तमाचा पत्ता नव्हता! असें या महिन्यांत दोन तीनदां झालें होतें. नेहमींप्रमाणें तिनें मसाल्याचें केशरी दूध तयार करून ठेविलें होतें, पण तें तसेंच लोळत पडलें होतें. तिनें स्वतः बांधलेला सुंदर कुलपी विडा, तिच्या चेहऱ्याप्रमाणेंच कोमेजून गेला होता. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें आपल्या प्रियकराचें मन प्रसन्न होऊन त्याला शीतल आराम मिळावा म्हणून, तिनें सुवासिक पुष्पांची जाळी गुम्फून, ती मंचकावर मच्छरदाणीसारखी लटकावून दिली होती. आणि मृदु मृदु परांच्या शय्येवर 'मस्कलव्हेंडर'चा शिडकावा करून सारें शय्यामंदिर सुगंधमय करून टाकलें होतें. शिवाय तिला आज आपल्या वल्लभाबरोबर 'कॅरम' खेळायचें असल्यामुळें तिनें तीही तयारी करून ठेविली होती. परंतु हाय!—आज सबन्ध रात्रभर सर्वोत्तमाचा पत्ता नव्हता!

तारकारत्नांचा सुन्दर हार हातांत घेऊन रजनीनें चन्द्राची मार्गप्रतीक्षा करीत उभें असावें, पण त्याचाच ठावठिकाणा नसावा आणि काळजीनें तिचें मुख काळवण्डून ती पूर्ण विकल होऊन जावी, असाच सुरेखेचा प्रकार झाला होता! रजनीला अमावस्या जशी दुस्सह होते, तशीच आजची रात्र तिला दुस्सह झाली होती. 'मला जेवायचं नाहीं!' म्हणून सन्ध्याकाळीं सहा वाजतांच बाहेर पडलेला आपला प्रियपति पहाटे चारीपर्यंत आला नाहीं, असें जेव्हां तिला दिसून आलें, तेव्हां तिच्या पोटांत धस्स झालें. तीरावर टाकलेल्या मासळीप्रमाणें ती सारखी तड-

फडत होती. मऊ शय्याही तिला कांट्याप्रमाणें खुपूं लागली. मन्द दीप-प्रकाशही तिला सहन होईना. सेण्टचें सुगन्धमय वातावरणसुद्धां 'क्लोरो-फार्म' प्रमाणें तिच्या डोळ्यापुढें अन्धाऱ्या आणूं लागलें. तिचा श्वासो-च्छ्वासहि तिला जड वाटूं लागला आणि तिच्या क्रोधाग्नीची आच तिच्या डोळ्यांना लागून त्यांतून एकेक अश्रुबिंदु निखळून खालीं पडूं लागला. नाना तऱ्हेचे विचार, नाना तऱ्हेचे विकल्प यांनीं तिचें मन अगदीं गोंधळून गेलें. पिंजऱ्यांत सांपडलेल्या वाघिणीप्रमाणें ती शयनमन्दिरात सारखी येरझाऱ्या घालूं लागली. शेवटीं चालून तिचे पाय थकले, तेव्हां ती आपल्या शय्येवर धाडदिशीं पडली. जाग्रणानें जड व आरक्त झालेले तिचे डोळे मिटूं लागले आणि सकाळपर्यंत जागत राहून सर्वोत्तम येताच त्याची चांगलीच खरपूसशी हजेरी घ्यायची, अशा दृढनिश्चयानें जागत बसलेल्या तिच्या मनावर निसर्गानें विजय मिळविला आणि तिला शेवटीं शेवटीं पहाटें झोंप लागली.

परन्तु तिचें मन आतां स्वप्नसृष्टींत उतरलें होतें. गुलाबी थण्डीच्या गुलाबी बहारांत तिला स्वप्नेंही गुलाबींच पडत होतीं ! अपराधी पति आपले पाय धरून आपली विनवणी करीत आहे आणि आपण रागानें दूर सरत आहोंत, अशा प्रकारच्या स्वप्नमय अभासांत ती गुंग झाली होती. गम्मत अशी झाली कीं, मनाप्रमाणें ती शरीरानेंही खरोखरीच दूर सरली आणि मंचकाखालीं धाडदिशी पडली. पण त्याचक्षणीं अर्धवट जागी होऊन, घाब-रून तिनें किंकाळी फोडली ! तिच्या अंगाला दरदरून घाम सुटला—ती थरथर कांपूं लागली.

'सुरेख ! सावध झालीस का ?' तिच्या केशकलापावरून नाजुक तऱ्हेनें हात फिरवीत तिला प्रेमळ स्वरांत कोणी तरी विचारलें.

आतां सुरेखा चांगली सावध झाली. तिनें आपले काळेभोर व पाणीदार डोळे उघडून प्रश्न विचारणाऱ्या व्यक्तीकडे एकवार पाहिलें आणि ती रागानें उठून उभी राहिली. पुन्हां एकदा तिनें डोळ्यावरून हात फिरविला, आपण स्वप्नांत नाहीं, याबद्दल आपल्या मनाची खात्री केली आणि अन्तस नागिणीप्रमाणें फूत्कार टाकीत ती त्या व्यक्तीकडे पाहूं लागली.

' कां रागाचं लाल निशाण अगदीं नाकावर चढवून आमच्याकडे पाहणं चाललंय्?'

' आज सबन्ध रात्रभर तुम्ही कुठें गेला होतां? '

' हं हं, याकरितांच का हा एवढा रुसवा?–खुळी–वेडी–पोरकट कुठली! वृत्ति चंचल! मन चंचल! तनुलताही चंचल!–तास दोन तास सुद्धां मंचकावर ठरत नाहीं; लागलीच धडाडधाड ऽऽ....'

' पुरे करा हा चावटपणा!—मी विचारतें, त्या प्रश्नाचं आधीं उत्तर द्या! '

' काय तोण्डीं परीक्षा चाललीय् वाटतं आमची ही?'

' हो हो, तोंण्डी परीक्षा चाललीय् मग काय तुमचं म्हणणं आहे? तीनचारदा हें असं झालं!—सांगा, द्या उत्तर माझ्या प्रश्नाचं! दिवसभर तुम्ही कुठंही भटकलां तरी हरकत नाहीं; पण रात्रीं माझ्या तुरुंगांतच येऊन तुम्हाला पडलं पाहिजे! '

' मग माझी कुठें ना आहे? कमलाच्या तुरुंगांत भ्रमर सांपडतो, तारकांच्या नजरकैदेंत चन्द्र पडतो, जिलबीच्या चक्रांत पाक घुटमळतो, तसा हा सर्वोत्तम सुरेखच्या मोहजालांत...'

' आतां पुरे करतां का तुमचं हें काव्य? या काव्याचा तर मला आतां कण्टाळा आलाय्! मेलं त्या चन्द्रसूर्यांना तरी किती वेठीला धरायचं नी त्या फळाफुलांना किती छळायचं? इकडे जगाला आग लागली, तरी तिकडे तुम्हाला काव्यं सुचतच असतात! कुणी जन्माला यायची सोय नाहीं, कुणाचं लग्न व्हायची सोय नाहीं कीं, कुणी मरायची सोय नाहीं; प्रत्येक वेळीं आपलं तुमचं भिकारडं काव्य आहेच! नवरा मेला म्हणून इकडे त्याची बायको ऊर बडवीत बसली, तरी तिकडे तुमचं तिच्यावरचं काव्यगायन सुरू असतंच!—बोला, रात्रीं कुठें गेला होतां? '

' त्याचं असं झालं,—' आंवंढा गिळीत व डोळ्यांची थोडीशी उघडझांप करीत सर्वोत्तम म्हणाला, ' काल मी आपले दोस्त–श्रीनिवास-राव, त्यांच्याकडे गेलों होतों. श्रीनिवास म्हणजे आपला आहे झालं!...'

'जरा विचार करून तरी थापा द्या! तुमचा तपास करण्याकरितां मी श्रीनिवासरावांच्या घरीं रघूला पाठविलं होतं, समजलांत ?–रघू!...'

'नव्हे नव्हे! काय बुवा गम्मतच आहे माझी! तुला आधीं माझा संशय आलेला अन् त्यांत मी असा विसराळूपणा करूं लागलों, म्हणजे मग चांगलंच!—त्याच्याकडे गेलों नव्हतों ग!–तो आपला जगदीश नाहीं का? त्याच्याकडे काढली कालची रात्र!'

'पण त्यांच्याकडेसुद्धां मी रघूला पाठविलं होतं!–रघू!...'

'तूं केव्हां रघूला पाठविलं होतंस?'

'रात्रीं अकरा वाजतां!'

'मग बरोबर!–साडेदहापर्यन्त मी त्याच्या घरीं बोलत बसलों होतों. नन्तर तो न् मी मिळून त्याचं दुसरं घर नाहीं का प्रतापचौकांत? तिकडे गेलों होतों. बरीच मण्डळी जमली होती तिथें! ..'

'अस्सं का? मग सबन्ध रात्रभर काय करीत होतां तिकडे?'

'काय सांगूं काल रात्रीची गम्मत तुला! विद्वान मण्डळी जमलेली. सारखा वादविवाद चालला होता आमचा काव्यावर!–अगदीं ऋग्वेदापासून तों परवां परवां प्रसिद्ध झालेल्या ताज्या चोपड्यापर्यन्त सर्व कवींना काढलं रात्रभर भरडून! तरी यांत विलायती एक सुद्धां कवि नव्हता हं!–सारा देशी माल! मी एकेका वक्त्याची अशी फटफजिती केली कीं ज्याचं नांव तें! तूं पाहिजे होतीस त्यावेळीं, पाठच थोपटली असतीस माझी!...' असें म्हणून लडिवाळपणानें सर्वोत्तमानें तिच्या खान्द्यावर हात ठेवला. त्याबरोबर तिनें तो झिटकारून टाकला आणि ती दूर सरून म्हणाली, 'मी तुम्हाला निक्षून सांगतें, तुम्ही माझ्या अंगाला हात लावूं नका! तुम्ही सांगताहांत वाटेल तें, पण तुमच्या एका शब्दावरही माझा विश्वास बसत नाहीं समजलांत?'

'पण तूं हें कशावरून ठरवतेस?'

'तुमच्या चेहऱ्यावरून! तुम्ही आपल्या अन्तःकरणाला कितीही लपविण्याचा प्रयत्न केलांत, तरी त्याचे खरे ठसे तुमच्या चेहऱ्यावर उमटले आहेत बरं! निखाऱ्यावर कपडा टाकला, तर तो आंतल्या आंत

कधीं दडपून राहील का ? डाम्बरावर पाणी ओतलं, तरी त्याची दुर्गन्धी कधीं झाकेल का ? काचेच्या पेटींत पदार्थ ठेवलांत, तर तो कधीं गुप्त राहील का ?

'अरे वा! तूं सुद्धां सुन्दर काव्य करूं लागलीस कीं! म्हणूनच म्हणतों कीं तूं काल पाहिजे होतीस!'

'मी काव्य करूं लागलें असेन, तर तो दोष आपला आहे; माझा नव्हे बरं—! वाण नाहीं पण गुण लागला म्हणायचा—! नाटक करताहांत, पण अजून कांहीं तें तुम्हांला नीट साधत नाहीं! खरं तेंच बाहेर पडतंय्!—मुकाट्यानं खरं सांगितलंत, तर धडगत आहे; नाहींतर या सुरेखशीं गाठ आहे, समजलांत ?'

'ही काय मला धमकी दिलीस कीं, वरप्रदान दिलंस? अग, तुझ्याशीं गाठ तर माझी जन्माचीच पडलीय्! आणि ती कायम राहावी म्हणून तिला वरचेवर चांचपून, ओढून घट्ट करतोंय्!—अग, काल खरीच काव्यचर्चा झाली आमची. सबन्ध रात्र त्यांत गेली. भानच राहिलं नाहीं आम्हांला! वाटेल तर साऱ्या कविमण्डळाला इथें बोलावून आणूं कां ?'

'नको! मेहेरबानी करा! तो आणि वेड्यांचा बाजार इथें भरायला नकोय्! माझा विश्वास नसला, तरी मी वादाच्या सोईकरितां तुमचं म्हणणं कबूल करतें! होय, घालीत होतां सारे मिळून तिकडे काव्यचर्चेचा गोन्धळ! पण इकडे तुमची पट्टराणी तडफडत पडली होती, त्याची कांहीं शुद्ध होती का तुम्हाला ?'

'अरेरे! सुरेख! गेल्या रात्रीं तुझे असे हाल झाले ना ? धिक्कार धिक्कार असो त्या काव्यचर्चेला!'

'तुमचा पत्ता नसल्यामुळं इकडे तुमची 'कुणी' तरी काळजीनं चूर होऊन गेली होती, याची होती का तुम्हाला शुद्ध ?'

'हाय हाय! खरंच, लाडके! काल माझ्या काळजीनं तुझ्या काळजाचं पाणी पाणी झालं असेल नाहीं ? चुकलंच माझं! काव्याच्या कुरणांतला गाढव बनलों मी! कुणीतरी माणूस तुझ्याकडे पाठवायला पाहिजे होता खरा!—'

' ही पलंगावर घातलेली सुवासिक फुलांची जाळी, काल सन्ध्या-काळीं तुमच्या देखतच मी गुम्फत बसलें होतें ना ?–'

' होय !'

' आणि ही पाहून सुद्धां तुम्ही त्या काव्यचर्चेच्या गोन्धळांत गुरफटलांत ?–काय पण रसिक तुम्ही ? धन्य असो तुमच्या रसिकपणाला ! नी म्हणे कवि !' असें म्हणून सुरेखेनें त्याच्यापुढें कोंपरापासून हात जोडले. '' मी मात्र इकडे मरमरून, पांच तास राबून ही जाळी विणली; म्हटलं, तुम्ही तिचं कौतुक कराल; मला शाबासकी द्याल नी आनन्दानं तिची सेवा स्वीकाराल; पण सारं व्यर्थ व्यर्थ झालं रे देवा !...' पुढें तिला बोलवेना; तिचा कण्ठ दाटून आला; तिच्या डोळयांत टचाचून पाणी उभें राहिलें.

' सुरेख ! तूं वाटेल तितकं मला कठोर बोल; मी तें कसंतरी सहन करीन; पण डोळ्यांतनं पाणी काढूं नकोस ! तें पाह्यलं कीं, इकडे माझा जीवच जातो ग !'

' पण तुम्ही ही जाळी पाह्यली होती ना ?'

' होय, पाह्यली होती. मला वाटलं, तूं मंगळागौरीकरितां करते आहेस !—'

' या वैशाख महिन्यांत मंगळागौरी असतात का ?'

' कुणी लेकानं या वर्षांत पंचांग पाह्यलंय् ?'

' पण तुम्ही काल विचारलंत, त्यावेळीं मी तुम्हाला सांगितलं होतं कीं, ही आपल्याच सेवेकरितां, म्हणून !'

' हो, सांगितलं होतंस खरं, पण मला त्यावेळीं ती थट्टा वाटली. माझ्याकरितांच हें मूर्तिमन्त काव्य रचीत असशील, असं मला शक्य वाटलं नाहीं !'

' तसंच तुमच्याबरोबर खेळण्याकरितां हा कॅरमबोर्डसुद्धां इकडे आणून ठेवला होता !'

' मग बिघडलं काय ? आत्तां खेळूं ! तुला तरी काय उद्योग आहे ?—बाकी मला वाटतं श्रीमन्तांच्या पेक्षां गरीबांचाच संसार सुखाचा होत असेल !–' कारण ' नाहीं विचारलंस ?—'

‘ एकतर्फीच काय ती होऊंद्या बडबड ! ’

‘ श्रीमन्तांच्या बायकांना घरकामं करायचीं नसतात; त्यामुळं त्यांना आपल्या नवऱ्यांना छळायला भरपूर वेळ मिळतो; नव्हे, हट्ट, रुसवा, फुगवा याशिवाय त्यांना दुसरा उद्योगच नसतो ! पण गरीबांचं तसं नाहीं; गरीबाची बायको कामाखालीं इतकी बेजार होऊन जाते कीं, बिचारीला चोवीस तासांत एक मिनीटभरही नवऱ्यावर तोण्डसुख घेण्याची शक्ति उरत नाहीं ! त्यांतल्या त्यांत श्रीमन्तांच्या पोरींना कांहीं पोरं बाळं झालीं, तर कांहींतरी त्यांच्या नवऱ्यांची धडगत असते ! ‘ कारण ’ विचारलं नाहींस ? ’

‘ एकदा सांगितलं ना कीं, एकट्याचीच टकळी चालू दे म्हणून ! ’

‘ कारण, पोरांच्या गोन्धळांत त्यांचं मन अडकलं कीं, तितकाच त्यांच्या जिभेचा जहालपणा कमी होतो !–नी पोरांमुळं तितकं नवऱ्याचं महत्वही नाहींसं होतं !–म्हणून मी देवाजवळ सारखा नवस करतों आहे कीं, देवा, काय वाटेल तें आमच्यापासून मागून घे, परन्तु आमच्या सौ. सुरेखा[redacted] वर्ष दोन वर्षांत कमींतकमी एक डझनभर तरी पोरं देऊन त्यांना चांगली घळघळीत लेकुरवाळी कर, आणि सोडीव एकदां या जाचांतून आम्हाला ! ’

‘ काय तुमच्या जिभेला हाड आहे कीं नाहीं ? दोन वर्षांत डझन मुलं व्हायला मी काय पुराणकाळची गान्धारी आहे कीं, वर्तमानकाळची मनी मांजरी आहे ? ’

‘ अग, देवाची करणी न् डोळ्यांत पाणी ! श्रीमुखांत लगावली कीं, तयार ! परवां एका वर्तमानपत्रांतच मी वाचलं कीं, ‘एका बाईला एकदम सहा पोरं झालीं अन् सर्व चिल्ल्यापिल्ल्यांसह ती बाळंतीण खुशाल आहे ’ म्हणून !–मग तिला जर वर्षांत सहा पोरं झालीं, तर तुला दोन वर्षांत...... ’

‘ खबरदार, माझी चेष्टा कराल तर ! ’

‘ अन् तुझं न् माझं लग्न झाल्यापासून ‘ स्त्रियांना दाढी मिशा कां येत नाहींत ? ’ याचीही उपपत्ति लागली !–‘ कारण ’ नाहीं विचारलंस ?–’

‘ हं, तुट्टूं देत अकलेचे तारे ! ’

‘ स्त्रियांना लहानपणापासून एकसारखी चोवीस तास बडबड करण्याची संवय असल्यामुळें तोंडाला आंतून जिभेचे अखण्ड, जबरदस्त धक्के बसत असतात ! त्यामुळं दाढीमिशांची मुळंच धरत नाहींत ! अर्थात्—’

‘ आणि तुम्हा तरी रिकामटेकड्या श्रीमंतांच्या पोरांना असल्या गाढवपणाच्या कल्पना काढण्यावांचून दुसरा कुठं उद्योग असतो ? ते समाजसत्तावादी लोक तुमच्या नांवानं उगीच ओरडत नाहींत ? तुमचे असले, थेर पाहूनच या ‘ भाई ’ची उत्पत्ति झालीय् समजलांत ? तुमची सारी सम्पत्ति हिसकावून घेऊन हे उघडे बोडके लोक ज्या दिवशीं बैलाप्रमाणं तुम्हाला नांगराला जुम्पतील तो दिवस मी धन्य समजेन ! ’

‘ मग मोत्यांच्या बांगड्या न् हिऱ्याच्या कुड्या आपल्याला मिळतील का ? अन् दिवसांतून तीन तऱ्हेचीं जरीचीं पातळं बदलायला सांपडतील का ? मग विसरा मोटारगाड्या नी नोकरचाकर !–मला नांगराला जुंपलं तर माझ्या जोडीला आपल्यालाही जोडतील, समजलांत ? ’

‘ कांहीं हरकत नाहीं. पण तुम्ही माझ्या नजरेसमोर तरी राहाल ! आतां सारखे रात्रीं अपरात्रीं परघरीं राहून फाजील फन्द तरी करणार नाहीं ! ’

‘ सुरेख ! शपथ मी कोणत्याही भलत्याच भानगडींत नव्हतों बरं ! ’

‘ एक तुम्हाला कीं, देवाला माहीत तुम्ही गेल्या रात्रीं काय करीत होता तें !’—असें म्हणून ती फणकाऱ्यानें आंतल्या दालनांत निघून गेली.

घरी अगणित श्रीमन्ती होती; नोकरचाकरही रगड होते; परन्तु उठल्याबरोबर आपल्या पतीला स्वतः चहा करून देण्याचा तिचा परिपाठ होता; आणि गम्मत अशी कीं, सर्वोत्तमास सुरेखेचाच चहा आवडत असे. नेहमींप्रमाणें नोकरानें चहाचें साहित्य तिच्याजवळ आणून ठेवलें; पण आज तिला इतका सन्ताप आला होता कीं, त्या भरांत तिनें तें भराभर बाहेर फेंकून दिले ! तो तिचा कराल अवतार पाहतांच नोकरांच्या तोण्डचें तर पाणीच पळालें. आणि इकडे सर्वोत्तमाचीही दारुण निराशा झाली !

आज उभयतांचीं भोजनेंही मूकव्रतानेंच झालीं. रोजच्या निम्यानेंही त्यांना जेवण गेलें नाहीं. जेवल्यानंतर त्याला स्वतः मसालेदार विडा करून देण्याचा तिचा रिवाज होता; पण आज त्याला काट मिळाला आणि सर्वोत्तमाचा विरस झाला! दोघांची वामकुक्षीही व्यवस्थित झाली नाहीं.

अशा तऱ्हेनें अस्वस्थ स्थितींत दोन तीन तास जातात न जातात तोंच 'सर्वोत्तमराव! अहो सर्वोत्तमराव!' असें पुकारत एक व्यक्ति त्याच्या घरांत शिरली. त्या व्यक्तीचा स्वर कानावर पडतांच सुरेखा ताडदिशी उठली आणि धांवतच त्या गृहस्थाकडे गेली आणि हांसत म्हणाली, 'या जगदीश भाऊजी! तुमच्या दुसऱ्या नव्या घरांत काल रात्रभर काव्यचर्चा झाली म्हणे!

'कुठली काव्यचर्चा? काव्य नाहीं न् चर्चा नाहीं! सब झूट!'

आपल्या मागून धांवत आलेल्या सर्वोत्तमाकडे वळून दांत ओंठ चावीत ती म्हणाली, 'ऐकलीत यांची साक्ष?—पक्के थापेबाज!'

या वेळीं सर्वोत्तमाचा चेहरा पाहण्यालायक झाला होता!



## : २ :  पाहण्यालायक चेहरे !

सकाळचे सहा वाजले होते. तिची झोप पुरी झाली नसल्यामुळें तिचा चेहरा म्लान दिसत होता. तिच्या मनांत नाना प्रकारच्या विचारांनीं थैमान माण्डलें होतें. तिनें सारें घर दिव्यांनीं शोधून पाहिलें; पण जेव्हां तिला अपेक्षित व्यक्ति दिसून आली नाहीं, तेव्हां तिचें मन अधिक खिन्न झालें. पण इतक्यांत तिचें तिलाच हांसू आलें. कारण सबन्ध रात्रभर घराचीं दारें बन्द असल्यामुळें बाहेरची व्यक्ति आंत येणें शक्य नाहीं हा साधा विचारहि आपल्यास कसा सुचला नाहीं, याचें तिला नवल वाटलें. तिनें आपले सर्व विकार दडपले आणि मुकाट्यानें ती आपल्या घरकामाला लागली. सकाळीं उठतांच प्रथम सर्व घर, अंगण झाडून चोहोकडे सडासम्मार्जन करून, देवापुढें, अंगणांत वगैरे चित्रविचित्र रांगोळी घालण्याची तिची पद्धति होती. त्याप्रमाणें ती आंतलें काम आटोपून, पुढील दार उघडून सर्व साहित्यासह अंगणांत आली.

इतक्यांत दाराच्या भिन्तीशी चिकटून उभा असलेला एक तरुण इसम दार उघडलें जातांच त्या तरुणीचा डोळा चुकवून आंत शिरला. त्याची कल्पना, त्या तरुणीला आपण उमगणार नाहीं. पण ती वस्ताद होती. तिच्या चाणाक्ष दृष्टींतून तो निसटणें शक्य नव्हतें. तिनें हातांतील साहित्य खालीं ठेवलें आणि ती धांवतच घरांत शिरली. अर्धवट अन्धारांत त्या इसमाचें तिला अर्धवट दर्शन झालें, तरी तो कोण आहे, याचें तिला पुरें ज्ञान झालें.

आपला पाठलाग करीत ती तरुणी येत आहे, असें पाहतांच त्यानें स्वयंपाकघराजवळच्या एका खोलींत प्रवेश करून धाडकन् दार

बंद करून घेतलें व ती धांवत येऊन त्या खोलीचें दार उघडणार, तोंच त्यानें आंतून कडी लावली! तिनें दोनचार धक्के देऊन पाहिले, परन्तु त्यानें दार उघडलें नाहीं कीं, 'हूं कीं चूं' केलें नाहीं. तेव्हां तिनेंहि बाहेरून कडी घालून घेतली!

त्याची ती लीला पाहून तिला सन्तापच आला. तिनें अधरदंश केला आणि ती मान हलवीत मनांत म्हणाली, 'हं, अस्सा यांनीं पोरखेळ चालविलाय् काय? ठीक आहे. खोडच मोडतें यांची चांगली!' असें म्हणून व मनाशीं कांहीं विचार ठरवून ती धांवतच बाहेर आली आणि जवळच शेजारीं दोन तीन घरांत जाऊन ओरडून म्हणाली, 'चला चला घरीं! चोर शिरलाय्! एका खोलींत गेलेला पाहून मी बाहेरून कडी घातलीय्!'

याप्रमाणें तिचे शब्द ऐकतांच दहापांच मण्डळी हातांत लाठ्या, कुऱ्हाडी, चाकू घेऊन चोर धरण्याकरितां तिच्या मागून धांवली व त्यांतला एक पोलीसचौकीवर वर्दी देण्याकरितां निघाला. तेव्हां ती म्हणाली, 'माधव भाऊजी, इतक्यांत पोलीसपर्यंत बोभाटा नको. आपणच प्रथम शोध करूं! खोलींत कोणीतरी शिरलंय्, एवढी गोष्ट नक्की!...'

'बरं तर. मग रागरंग पाहूनच काय तें करूं, पण त्याच्याजवळ पिस्तूल बिस्तूल असलं तर?—' माधवरावांनीं पिस्तूलाचें नांव काढतांच कुऱ्हाड–काठीवाल्यांची वीरश्री लटपटून, त्यांचे हात थरथर कांपूं लागले!

'कुठलं मेल्याजवळ पिस्तूल असतंय्? फुंकणीसुद्धां नसेल! कुणीतरी भुरटा आहे मेला! सकाळच्या प्रहरीं कांहीं सापडला लग्गा तर पाहायचं न् दुसरं काय?' तिनें सर्वांना धीर दिला.

त्या खोलीच्या दारावर सर्वांची एकच गर्दी झाली. सर्व ओरडूं लागले, 'आंत कोण आहे? दार उघडतोस कीं, नाहीं? कोण असशील तो चटकन् बाहेर ये, नाहीं तर दार फोडून तुला बाहेर काढूं!'

खोलीच्या दारावर जमलेला तो सशस्त्र जमाव पाहून आंतील इसम गोंधळून घाबरून गेला. दुसऱ्या एखाद्या दारानें बाहेर निसटावें म्हटलें, तर तेंही शक्य नव्हतें. 'आपण करायला गेलों काय नू

झालें काय ?' असें त्याला होऊन गेलें. तशा गोन्धळलेल्या स्थितींतही त्याला मधून मधून हांसूं येत होतें. 'मारे लेकाचे चोर पकडण्याकरितां म्हणून सारे जमले आहेत, पण मला पाहतांच त्यांचे चेहरे कसे होतील? गम्मतच उडेल! आतां आपण काय करावं? दाराची हळूच कडी काढावी नी वरच्या माळ्यावर जाऊन बसावं आणि हे सारे शूरवीर आंत येतांच वरून कुणातरी धटिंगणाच्या—माधवरावाच्याच—मानगुटीवर भुतासारखी उडी मारावी. अन् नन्तर बघावी या बहादुरांची गम्मत! बेशुद्धच होऊन पडतील एकेक गुलाम!' असा विचार करून व कपडे काढून, तो हळूच चोरपावलांनीं दाराजवळ आला आणि कुणाला न समजेल अशा तऱ्हेनें कडी काढून, खुण्टीला धरून माळ्यावर चढण्याचा प्रयत्न करूं लागला.

पण त्याचें नशीब असें शिकन्दर कीं, वर चढण्याचा त्याचा प्रयत्न चालला असतां, पलीकडच्या खुण्टीवर असलेल्या फळीला, अन्धारांत त्याची लाथ लागली आणि तीवर असलेल्या चिनीमातीच्या, कांचेच्या पितळेच्या दहा पांच बरण्यासहित ती धाडदिशीं खालीं कोसळली आणि त्यांचा चुराडा उडून, त्यांत असलेल्या मुरम्ब्याचा, मुरवळ्याचा, लोणच्यांचा चोहोकडे एकच चिखल झाला. आणि यामुळें गांगरून जाऊन त्याचा हात निसटला व तोही त्यांत पडला!

आंतील आवाज ऐकतांच बाहेरच्या शूरवीरांचें धाबें दणाणलें. आंत कोणी तरी भयंकर व्यक्ति आहे, अशी सर्वांची निश्चिति झाली. कोणी म्हणाले, 'हा आवाज पिस्तुलाचा असावा!' झालें! प्रत्येक जणाची एकेक पावलानें पुच्छप्रगति होऊं लागली.

तेव्हां ती तरुणी त्यांना धीर देत म्हणाली, 'भिऊं नका! हा आवाज पिस्तुलाचा नाहीं. त्या मेल्यानं साऱ्या बरण्या खालीं पाडून साऱ्या मुरम्ब्यालोणच्यांचा विध्वंस केलेला दिसतोय्! खुशाल उघडा दार! त्यानं आंतून नाहीं कडी काढली, तर दार फोडून काढा!'

अशा त्या बरबटलेल्या स्थितींतच तो उठून उभा राहिला. आतां पुढें काय करावें, हें त्याला सुचेना. बाहेर जमलेल्या जमावाची फजिती

करण्याच्या भरांत त्याची स्वतःचीच फजिती झाली! अन्धारांत चांचपडत असतांना त्याच्या हाताला एक गाठोडें लागलें. त्यानें तें भरकन् सोडून त्यांतल्या कपड्यांनीं तो अंग पुसण्याचा प्रयत्न करूं लागला, पण त्याच्या दुर्दैवानें तें गाठोडें कापसाचें निघून त्याच्या अंगभर कापूस चिकटला आणि त्याला उत्तरध्रुवाकडील पांढऱ्या अस्वलाचें स्वरूप प्राप्त झालें.

इकडे त्या तरुणीचा दार फोडण्याबद्दल मोठमोठ्यानें आग्रह चाल-लाच होता. तेव्हां तें कसें काय फोडतां येईल, तें पाहण्याकरितां म्हणून दोघांतिघांनीं त्याला धक्के दिले, तों तें एकदम आंत लोटलें जाऊन ते तिघेही धाडदिशीं खालीं पडले आणि त्यांनीं घाबरून किंकाळी फोडली! त्याबरोबर बाकीची मण्डळी पळण्याचा बेत करूं लागली. त्यांची ती घाबरगुण्डी पाहून, आलेलें हांसें आवरीत ती म्हणाली, ‘भिऊं नका! तुमच्या जिवाला धक्का लागणार नाहीं! त्याबद्दल मी जबाबदार आहे!’

परन्तु चोर पकडायला आलेल्या शेन्दाडशिपायांची मनःस्थिति, तिचे धीराचे शब्द ऐकण्याइतकी ठिकाणावर नव्हती. पुन्हां त्यांत खोलीच्या उम्बऱ्यावर पालथें पडलेल्या त्रयीला आंत पांढऱ्या भुताचा भास झाला होता. त्यामुळें तर सर्वांची घराकडे धूम ठोकण्याची एकच घाई उडाली होती! अशा परिस्थितींत तिचें कोण ऐकणार? इतक्यांत आपल्या कृतीचा कांहींतरी विपरीत परिणाम होईल, अशा शंकेनें खोलीं-तील इसम एकदम बाहेर आला आणि मोठ्यानें ओरडून म्हणाला, ‘माधवराव! अहो, माधवराव! भिऊं नका! मी तो श्रीनिवास नव्हे का?’

परन्तु श्रीनिवासच्या कर्कश आरोळ्या त्या मंडळीच्या कानांत शिरत नव्हत्या. त्यांना केवळ आपलें घर दिसत होतें! पण इतक्यांत घाई करून ती चपल तरुणी दरवाजांत गेली आणि त्यांना आडवून म्हणाली, ‘असं काय भितां तें? ती पाहा, घरची स्वारी नाहीं का ती? भुताचा वेष घेणं झालंय् भुताचा!’ असें म्हणून ती मोठ्यानें हांसली! तेव्हां त्या मण्डळींना स्वतःच्या भ्याडपणाची लाज वाटून त्यांनीं आपलीं तोण्डें त्या भुताकडे वळविलीं आणि त्याला निरखून पाहिलें, तों काय?

खरोखरीच घराचे मालक श्रीनिवासराव ! तेव्हां माधवराव म्हणतात, 'वाः श्रीनिवासराव ! खूप आम्हांला बनविलंत ! बरं तर बरं, जयश्री वहिनी धीराच्या म्हणून हें थोडक्यावरच निभावलं; नाहींतर भलताच अनर्थ झाला असता ! '

'हें पहा, माधवराव ! आम्ही गद्धेपंचविशींतले तरुण म्हणजे असेच ! करतों कांहीं तरी न् मग हें असं लोकांत हांसं होतं ! आतां गांवभर बोभाटा होईलच कीं, नाहीं आमच्या सोंगाचा ? काल रात्रीं आमच्या त्या 'जॉलीक्लबां' त ग्वाल्हेरच्या प्रख्यात खुदाबक्ष खाँसाहेबांचं गाणं होतं. मी क्लबचा मेम्बर असल्यामुळं मला जाणं भागच होतं. मला जेवायचं नसल्यामुळं 'मी रात्रीं एक वाजतां येईन' असं हिला सांगून मी लवकरच घराबाहेर पडलों. पण माझ्या कल्पनेप्रमाणं गाणं रात्रौ एकाला न आटोपतां पहाटेचे पांच वाजेपर्यंत झालं ! आहाहा ! काय बहार झाली म्हणतां ? शेवटची भैरवी ऐकून तर दिल फाटून गेला ! त्यांत तबल्याची साथ त्या सूरजसिंहाची, मग काय विचारतां ? नंतर एक तासभर गप्पा गोष्टी झाल्या. घरापर्यंत आलों तों उजाडलं. मग म्हटलं, आमच्या राणीसाहेब आमच्यावर रागावल्या असतील. तेव्हां त्यांची कांहीं तरी गम्मत करावी, म्हणून त्यांना न कळत आंत शिरलों, तों त्यांची गम्मत राहूली बाजूला नी आमची मात्र चांगलीच गद्धेगम्मत झाली ! शिवाय बरण्यांचा चुराडा उडून मुरम्ब्यांची नासाडी झाली ती निराळीच !' असें म्हणून तो हांसला.

'पण आम्ही हाक मारल्याबरोबर बाहेर यावंत कीं, नाहीं ? ' माधवराव म्हणाले.

'हिच्याबरोबर तुम्हा मण्डळीचीही थोडीशी गम्मत करावीशी वाटली, पण सारंच गाडं फिसकटलं ! आतां ही आमची अक्कल बाहेर पसरूं देऊं नका हं. नाहीं तर गांवांतले लोक तोण्ड काढूं देणार नाहींत !' असें म्हणून तो पुन्हा मोठ्यानें हांसला.

'पण अशा स्थितींत तुम्ही राहाणार किती वेळ ? आतां चांगलं गरम पाण्यानं स्नान करून स्वच्छ व्हा बरं !'

'हो, लागतोंच आतां त्या नादाला!' असें म्हणून श्रीनिवास न्हाणीघराकडे वळला. सर्व मण्डळी हांसत व चर्चा करीत घरीं निघून गेली.

जयश्रीची वृति मात्र गम्भीर झाली होती. चलच्चित्रपटाप्रमाणें तिच्या डोळ्यापुढून नाना तऱ्हेचीं शुभाशुभ चित्रें भराभर निघून जात होतीं. अशा मनःस्थितींतच ती मुकाट्यानें न्हाणीघराकडे गेली व तिनें 'गरम झरा' पेटविला. श्रीनिवासनें तिच्याशीं दोन तीनदा बोलण्याचा प्रयत्न केला. पण त्याला उत्तर न देतां ती तशीच दिवा पेटवून मुरम्ब्यांच्या खोलींत गेली, तिनें खिडक्या उघडून उजेड केला आणि बरण्यांच्या साऱ्या कांचा बाहेर फेकून देऊन व पतनस्थितींतून वाचलेला मुरम्बा, मुरवळा, लोणचीं दुसऱ्या भाण्डयांतून भरून, ती खोली स्वच्छ केली.

इतकें होत आहे तो 'झरा' गरम झाला. श्रीनिवासनें पाणी उसपून घेतलें. जयश्रीनें त्वरा करून 'हमाम' सोपची वडी, टॉवेल व चुण्या केलेलें धोतर त्याच्या जवळ नेऊन ठेवलें.

श्रीनिवासनें हांसत, लडिवाळपणानें दोन शब्द बोलून तिच्या गुलाबी गालास स्पर्श केला व ती खुदकन् हांसेल म्हणून तिच्या मुखाकडे पाहिलें. परन्तु या वेळींहि तिनें त्याच्याशीं मूकव्रत धरून गम्भीर चेहऱ्यानें तिथून प्रयाण केलें.

तिचा तो अबोला पाहून श्रीनिवास आपल्याशीं म्हणाला, 'एकं दरींत प्रकरण फारच गरम झालेलं दिसतंय्! पारा शून्यांशावर आणायला बारचसा प्रयास पडणारसा दिसतो!'

त्याचें स्नान झाल्यावर त्यानें धोतर नेसून, थोडेसें सेंटेड हेअर ऑईल केसांना चोळलें व त्यांचा भांग पाडला व अंगांत सिल्कन शर्ट चढविला. इतक्यांत जयश्रीनें एका डिशमध्यें लोणी व पावांचे तुकडे व कपभर चहा नेहमींप्रमाणें त्याच्या टेबलावर नेऊन ठेवला. पण तिकडे ढुंकूनहि न पाहतां व तिच्याशीं न बोलतां तो डोक्यावर टोपी ठेवून मुकाट्यानें बाहेर पडला.

तिनें तो प्रकार पाहिला आणि आपली माथा लागूं पडली, असें

वाटून तिला थोडेसें समाधान झालें. आपला अधरोष्ठ चावून ती मनांत म्हणाली, ' करून सवरून आणि माझ्यावरच राग अं ? '

आज ती नित्याप्रमाणें गृहकृत्यें करीत होती. पण त्यांकडे तिचें नीटसें लक्ष्य नव्हतें. आज एकदांच नव्हे, तर गेल्या महिन्यांत दोन-चारदां तिच्या संसारसागरांत अशाच तऱ्हेचीं वादळें झालीं होतीं. लग्न झाल्यापासून असें कधीं झालें नव्हतें. अन् आतांच कां असें व्हावें, याचें कोडें तिला उलगडत नव्हतें. कामें करीत असतांना ती वारंवार चुकत होती, यावरून आपलें मन आज ठिकाणावर नाहीं, याची तिला कल्पना झाली होती. म्हणून स्वयम्पाक करतांना तिनें फार सावधगिरी बाळगली. इतकेंच नव्हे, तर मन भ्रमिष्ट झाल्यामुळें सर्व पदार्थांत सर्व जिन्नस व्यवस्थित पडले आहेत कीं, नाहीं हें पाहण्याकरितां–प्रथम देवाला नैवेद्य दाखवून–तिनें ते स्वतः चाखून पाहिले व त्यांत कमीअधिक तिखटमीठ घालून ते नीट केलें.

रोजच्याप्रमाणें तिनें दहाबरोबर जेवणाचें पान मांडलें. कारण श्रीनिवासला अकरा वाजतांच ऑफिसला जायचें होतें. इतक्यांत तो बाहेरून आला व जेवणाची सूचना मिळतांच पाय धुवून पानावर बसला. अजूनहि स्वारी गरमच होती. दोन चार घांस पोटात जातात न जातात तोंच त्यानें तोंड वाईट केलें आणि चडफडत तो म्हणाला, ' बायका करायच्या म्हणे बायका ! कशाला ? धड जेवायलासुद्धां नीट मिळत नाहीं ! आज एक जिन्नस चांगला झाला असेल तर शपथ ! '

' काय बिघडलंय ? '

'काय बिघडलंय् ? खाऊन पाहा म्हणजे समजेल ! भात म्हणजे नुसता चिखल गोपीचन्दन झालाय् ! वरणांत मीठ नाहीं ! आमटीला फोडणी नाहीं ! भाजीला गूळ नाहीं ! चटणींत तिखट नाहीं ! भरतांत साखर नाहीं ! पोळ्या तर नुसत्या चामड्याप्रमाणं वातड झाल्या आहेत ! नी म्हणे ' काय बिघडलंय ? '

' आपली स्वारी शुद्धीवर आहे का ? '

' जास्त बोलूं नकोस. ताट फेकून मारीन ! '

' इतके श्रम घेण्यापेक्षां जरा नीट भानावर येऊन पदार्थ चाखून पाहाल तर बरं होईल ! ताट फेकलंत, तर माझं डोकं फुटेल, पण आपकं कसं ताळ्यावर येणार ? आजचा प्रत्येक जिन्नस मी काळजीपूर्वक तयार केलाय् बरं ! '

' स्वयंपाक तूं केला असशील काळजीनं, पण खातोंय् मी ना ? त्याची रुचि मला कळणार कीं, तुला ? '

' हां, हा प्रकार होणार हें मला माहीतच. कारण अपराध स्वतः करायचा न् मग दुसऱ्यावर रागावून तो जिरवायचा, ही पुरुषांची नीति कांहीं आजचीच नाहीं. आज जेवतांना खटका उडणार, हें जाणूनच मी सारे पदार्थ आधींच चाखून पाहिले आहेत बरं ! इतका कांहीं धांगड-धिंगा घालायला नकोय् ! '

आपल्या पत्नीचें हें रामबाण उत्तर ऐकतांच श्रीनिवास तर अगदींच सर्द झाला. आणि एकदां तिच्याकडे रागानें पाहून मुकाट्यानें जेवूं लागला. तेव्हां जयश्रीला अधिकच स्फुरण चढलें आणि तिनें आपल्या तोण्डाचा पट्टा सोडला, ' काल रात्रीं क्लबांत गवयांचं गाणं होतं का ? करतें कीं, तपास ! याबद्दल मी जाब विचारीन म्हणून सकाळपासून हीं सोंगं चाललींयत ! आम्हीं बायका मरमरून सुग्रास जेवण तयार करतों पण त्याचं कांहीं नवऱ्यांना असतं का ? एका शब्दानं आमच्या श्रमाचा चुराडा उडवून पार ! मी म्हणतें, बिघडला असेल एखाद्या वेळीं स्वयंपाक, म्हणून काय अशी नवऱ्यांनीं डोक्यांत राख घालायची ? एखादा दिवस नको सहन करायला ? आपलीं तरी ऑफिसांतलीं कामं रोजच्यारोज बिनचूक होतात ? वरच्या ऑफिसराकडून कधीं नाहीं ना पुष्पांजली मिळत ? नसेलच मिळत ! पानावर बसून अन्नाची निन्दा होऊं लागली म्हणजे आम्हां बायकांचं हृदय कसं सुरीनं चरचर चिरतं, नी आम्हांला कशा यातना होतात, त्याची कल्पना आपल्याला जीजन्म आल्यावांचून होणार नाहीं ! देवानं करावं नी पुढचा जन्म आपल्याला बायकोचाच मिळावा.'

' अन् तूं माझा नवरा होणार वाटतं ? '

'मी नवरा झालें, तर पाहावं तरी आपल्याला कशी फुलासारखी झेलतें ती! अशी अरेरावी गाजविणार नाहीं!'

'हं हं, समजलं ज्ञान! स्वयंपाक करायला येत नाहीं अजून न् म्हणे...'

'हं, तेवढं मात्र बोलूं देणार नाहीं! हॉटेलांत वाटेल तें गिळून यायचं नी मग घरच्या स्वयपाकाची कशी गोडी लागणार? जेवणा-आधींच ढेंकरा देताहांत, त्यावरूनच मी समजलेंय् कीं, तें हॉटेलचं घाणे-रडं आम्बोण खाऊन आपण आला आहांत म्हणून! आपल्याला तेंच बरं वाटायचं!'

'असल्या बायकांशीं गांठ पडल्यावर जेवण तरी कसं जायचं?'

'सुग्रास जेवण केलंय्, पण नशीबांत पाह्यजेना? चलावं, आत्तां शेजारच्या दहा लोकांना बोलावून आणतें नी त्यांना हें खाऊं घालून खऱ्याखोट्याचा सोक्षमोक्ष करतें, आहे कबूल? आपलं म्हणणं खोटं ठरलं तर काय हराल?'

यावर श्रीनिवास कांहीं न बोलतां मुकाट्यानें कपडे चढवून, सिगार फुंकीत कचेरीकडे चालता झाला. सन्ध्याकाळीं कचेरी आटोपल्यावर तो व सर्वोत्तम असे दोघेजण गप्पा गोष्टी करीत करीत घरीं आले. सर्वोत्त-माला पाहतांच, कां कोण जाणें, जयश्रीचें पित्त खवळलें आणि ती आपल्या पतीला सन्तापानें म्हणाली, 'याला आधीं घराच्या बाहेर घालवा बरं! याच्या पायांतच आपण बिथरत चालला आहांत!'

तिचे ते शब्द ऐकतांच दोघांचेही चेहरे पाहण्यालायक झाले!

---

## : ३ : मोहनमंदिरांतील गुलछबू !

तिच्या गुलाबी गौरवर्णाला अबोली रंगाचें गर्मरेशमी, झिरझिरीत, तलम, पातळ फारच शोभून दिसत होतें. वास्तविक असलें पारदर्शक महावस्त्र नेसून वावरताना एखाद्या मर्यादशील स्त्रीला लाजच वाटली असती. पण तारुण्याच्या ऐन बहारींत असलेल्या छबूला आपलें अस्पष्ट, मादक व वस्त्रगाळ सौन्दर्य अर्धवट, गुलहौशी तरुणाना दाखवून त्यांना मोह पाडण्याची चटकच लागली होती. अथवा कोणीतरी मुद्दाम ती तशी लावली होती! तिच्या वर्तुलाकार, उन्नत व पुष्ट उरोजांना अर्धवट झाकणारी, गोंवा फॅशनची, निळ्या वर्णाची, रेशमी, तंग, कटोरा चोळीही आमच्या म्हणण्याची साक्ष देत होती. कारण तीवरून अनेक सुरकुत्यांचा, पदराचा पडदा लपेटलेला होता, तरी ती त्यांतूनही स्वच्छ दृग्गोचर होत होती. अथवा आपल्या तारुण्याच्या गोल; गौरीशंकराभोंवतीं, आम्बटशोकी लोकांचें लक्ष्य घिरट्या घालीत राहावें, असा जणुं काय तिचा संकेतच होता! तिचा चेहरा, तिचे डोळे, तिची नासिका, तिचे दंत सर्वच कांहीं मोहक होतें. जणुं काय विधात्यानें सर्व स्त्रीसृष्टि निर्माण केल्यावर मनाला समाधान न वाटल्यामुळें पुन्हां चित्रकलेचा झपाटून अभ्यास करूनच हें 'मॉडेल' तयार केलें होतें! हें वास्तविक रत्न एखाद्या सम्राटाच्या जवाहीरखान्यांतच पडावयास पाहिजे होतें परन्तु विधात्यानें तिच्या सौन्दर्याप्रमाणें तिच्या ललाटाचीही खबरदारी न घेतल्यामुळें तें त्रिविक्रमपन्तांच्या हॉटेलांत–मोहनमन्दिरांत येऊन पडलें होतें.

पहिल्या व दुसऱ्या प्रकरणांत ज्या गोष्टी घडून आल्या, त्या दिवशींचीच सन्ध्याकाळची, आठाची वेळ होती. छबू आपल्या ड्रेसरूमधें,

एका मोठ्या बिलोरी आरशाच्या टेबलासमोर उभी राहून आपली केश-रचना करीत होती. सकाळीं व संध्याकाळीं याप्रमाणें दिवसांतून दोनदा ती आपली केशरचना करीत असे. इलेक्ट्रिकचा झगझगीत प्रकाश तिच्या कानांतील हिऱ्यांच्या कुड्यावर पडून त्या चमूचमू चमकत होत्या आणि नाकांतील हिरकणीही चमकण्याच्या बाबतींत कुड्यांना साथ करीत होती. गळ्यांत एक मोत्यांची मोहनमाळ व हातांत एकेक मोत्यांची बांगडी—बस! इतकेंच अलंकार तिनें धारण केले होते. पण एवढ्या तुटपुंज्या दागिन्यां-नींहि पंधराशें रुपये गिळंकृत केले होते!

आपल्या सौन्दर्याचें कौतुक वाटून ती आपल्याशींच हांसत होती. तिचें तें हांसरें सौन्दर्य उन्मादकारी होतें, यांत शंका नाहीं. त्यांत सुवासिक सेण्टचा सुवास रूममधें दरवळून गेल्यामुळ सारें वातावरणही धुन्द झालें होतें.

तिच्या रेशमाप्रमाणें मृदु व लाम्ब असलेल्या केशकलापाची रचना पूर्ण होते न होते, इतक्यांत मागील दार उघडून एक, गौरवर्णाचा, मोहक, प्रौढावस्थेच्या जवळ आलेला तरुण आंत आला. त्याच्याकडे वळून पाहून ती एकदां हांसली आणि पुन्हां आरशांत पाहूं लागली.

'या पुष्ट, कृष्ण केशकलापावर एक गुलाबपुष्प पाहिजेच नाहीं?'

'हो अवश्य पाहिजे!' छबू मान वळवून स्मित करीत म्हणाली.

'मग हें अस्सं खोंवलंच पाहा त्यावर!' असें म्हणून त्या तरु-णानें स्वतः खुडून आणलेलें, एक टवटवीत गुलाबाचें फूल तिच्या बुच-ड्यावर खोंविलें. 'छान! कितीपण शोभा आली माला! पण ती तुला कशी दिसणार? थाम्ब हं, दुसरा आरसा धरतों मागं!' असें म्हणून त्यानें एक झटकन दुसरा आरसा आणला आणि तो तिच्या मागें धरला.

'फारच चांगलं दिसतं हो हें फूल! विक्रम, तुम्ही कीं नाहीं खरे खरे रसिक आहांत पाहा! फूल घेऊन कसे वेळेवर आलांत!' असें म्हणून तिनें आपले गौर बाहुपाश त्याच्या कण्ठाभोंवतीं टाकले. इतकें झाल्यावर तो रसिक (?) विक्रम तरी ती आयती सुसंधि कशी दवडील? त्यानेंही तिच्या मखमलसम अधरोष्ठावर आपले ओठ टेकले व [illegible]

'रसिक' ही पदवी सार्थ केली. मग तीं दोघेंही दार पुढें करून, एका कोंचावर जवळ जवळ बसलीं, व त्यांच्या गप्पा गोष्टी सुरू झाल्या.

'विक्रम!' छबू गम्भीरपणें म्हणाली, 'आज बरेच महिने माझ्या मनांत एक गोष्ट डांचतेय्, ती आज तुमच्यासमोर बोलून दाखवावी, असं मी ठरविलंय्. तुम्हाला वेळ आहेना?'

'हो हो, खुशाल बोल!' विक्रम संशयभिन्न आतुरतेनें म्हणाला.

'विक्रम! मी चांगल्या कुळांतली, पण तुमच्या सौन्दर्याला, तुमच्या स्वभावाला, नी तुमच्या रसिकतेला भुलून तुमच्यावर प्रेम केलं, तुम्हाला तन-मन-धनासहित सर्वस्व अर्पण केलं, तें याकरितां का? माझी चूक झाली का? मी फसलें का? एक वर्ष झालं, या शहरीं आपण हॉटेल घातल्यापासून, तुम्ही आतांपर्यंत माझा कसा बरं उपयोग करून घेत-लांत? हॉटेल घातल्याबद्दलही माझं कांहीं म्हणणं नाहीं; प्राथमिक भाण्डवल तर मीच दिलं; माणसानं कोणताही धन्दा प्रामाणिकपणें करावा नी पैसा कमवावा; पण हें काय? हा प्रकार मला कसा तरी वाटतो! माझ्या सौन्द-र्याच्या आकर्षणानं हॉटेलचं गिऱ्हाईक तुम्ही आपल्याकडे ओढताहांत! या आरंभीच्या वर्षांत हॉटेलचा जम चांगलाच बसलाय्. पण लोक येतात ते खाण्याकरितां येत नसून मला बघण्याकरितां येतात! पण या प्रकाराचा आतां मला वीट येऊं लागलाय्! त्यांतून तुम्ही आतां रात्रीं जुगाराचाही अड्डा सुरू केलाय्. पण अशानं उभयतांना तुरंगाची हवा न मिळो, म्हणजे मिळविली! त्यांतून रोजच्या जागरणांनीं माझी मोहकता तर नुसती करपून निघतेय्. माणसाला योग्य वेळीं योग्य विश्रांति मिळाली, तरच त्या सौन्द-र्यांत मोहकता कायम राहते; नाहींतर कृत्रिम उपायांनीं ती किती टिकाव धरणार? कोमेजलेल्या फुलावर पाणी मारलं, तर तें कधीं टवटवीत दिसेल का?...'

'कां? थाम्बलीस कां?' विक्रम म्हणाला, 'तुझे सारे मुद्दे सम्प-ल्यावर मग मी उत्तर देणाराय्!—हं, चालूं द्या!'

'तसंच ते तिघे—तो सर्वोत्तम, तो श्रीनिवास नी तो जगदीश—ते तिघेही माझ्या नादाला लागलेयत. काल मेल्यांनीं फराळावर ताव मारून

रात्रभर जुगार काय खेळला, दारू किती ढोसली नी धिंगाणा किती घातला! प्रत्येकाला शुद्धीवर आणून, त्यांची घरीं पाठवणी करीपर्यन्त माझ्या नाकी नऊ आले. रोज रात्रीं तर दहा अकरापर्यन्त त्यांची इथें बैठक असतेच! मला कीं नाहीं त्यांच्याबद्दल काळजी वाटूं लागलीय्!—'

'त्यांच्याबद्दल काळजी? ती कां म्हणून?'

'बिचाऱ्यांच्या घरीं बायका असतील; इथें तर हे व्यसनी बनत चाललेत; मग त्यांची काय बरं अवस्था होईल? त्यांचे संसार उध्वस्त होणार नाहींत का?'

'मग होईनात!'

'असं कसं म्हणतां, विक्रम? समजा, आत्तांच्या आत्तां वरून तुळई कोसळून तुमच्या डोक्यावर पडली न् तुमचं कांहीं बरं वाईट झालं, तर मला कसं वाटेल? तसंच त्यांना!' छबू म्हणाली, 'शिवाय तिघांचीही नजर माझ्याकडे लागल्यामुळं माझ्या मनांत एक निराळीच भीति डोकावूं लागलीय्; आज ते तिघे 'मित्र' म्हणून इथें येताहेत, पण उद्यां माझ्याबद्दल त्यांच्या मनांत मत्सर उत्पन्न झाल्यामुळं एकमेकांचे हाडवैरी बनून ते एकमेकांचा घात करणार नाहींत म्हणून कशावरून? अथवा तुमच्या तरी जिवावर उठणार नाहींत म्हणून कशावरून? स्त्री, तिचं सौंदर्य नी त्यामुळं निर्माण झालेला उन्माद मोठा भयंकर असतो! राक्षसी डायनामाईटच तो! केव्हां स्फोट होईल, याचा नियम नाहीं! नीं त्यांत त्यांना जुगार-दारूंचा पाठिम्बा, मग काय विचारता? म्हणून म्हणतें, पाहा, विचार करा नी माझ्या सौन्दर्याच्या जोरावर हें हॉटेल, हे 'मोहनमन्दिर' न चालवतां, पक्वान्नाच्या लज्जतीवर, सरळ चालवा!'

'नुसत्या पक्वान्नांच्या जोरावर माझं हॉटेल कसं चालेल? मी खव्यांत निम्मा बटाट्याचा गीर मिसळून त्याची बर्फी करतों; केशरांत तर निम्मा रंग मिसळतोंच; बुन्दीच्या कळ्या तेलांत तळल्यावर मग त्यावर साजूक तूप शिम्पून त्याचे लाडू वळतों; भजांची-जिलबीचीही तीच अवस्था; शिळ्या भाज्या, भजीं एकत्र वाटून त्यांची चटणी बनवतों; उरल्यासुरल्या उसळी एकत्र गरम करून न् त्यांना चमचमीत फोडणी देऊन त्यांची

मिसळ करतों; तवकील मिसळून बासुन्दी अन् पीठ मिसळून श्रीखण्ड—असलीं हीं आमचीं पक्वान्नं, नी किम्मत मात्र दुप्पट घेतों; तोच तोच चहा उकळून देतों; स्वच्छता तर काडीचीही नाहीं; नुसती वरची फॅशन मात्र पाहून घ्यावी! असल्या हॉटेलांत तूं नसलीस तर कोण येणार? रात्रीचा गुप्तपणें माडीवर अड्डा घातलाय् म्हणून तर आमची चलती आहे! तुझ्यामुळंच भिकार पदार्थांचे दुप्पट पैसे मिळतात. आपण वाटेल तर जुगारांत भाग घेऊं नये. शिवाय तुला दागदागिने मिळाले ते? आत्तां मला तत्वज्ञानाच्या गोष्टी सांगतेय्स, पण बघतां बघतां त्या सर्वोत्तमाला भुरळ पाडून आठशें रुपयांच्या हिऱ्यांच्या कुड्या उपटल्यास, त्या श्रीनिवासला भुलवून मोत्यांच्या बांगड्या लाटल्यास, अन् त्या जग्या-पासून दोनशें रुपयांचा शालू लुंगावलास; अन् वर त्यांना स्वतःच्या अंगाला हात लावून देत नाहींस ती नाहींसच! हें सारं पचवून ढेंकर दिल्यावर आतां हा वेदान्त आठवला होय?'

'या वस्तु घेतांना त्यावेळीं मला बरं वाटलं, पण आतां मला कससंच होऊं लागलंय्! माझ्या सौन्दर्याची ही अशी विक्री करायची, म्हणजे मी 'वेश्या' आहे कां, विक्रम? वाटेल तर या वस्तु परत देऊं का?'

'तेवढं मात्र करूं नका बरं, बाईसाहेब!'

'तें कां?'

'असल्या आत्मघातकी नीतीच्या कल्पनांनींच आमचा देश धुळीला मिळाला! दुसऱ्याला लुबाडून आपला आत्मा तृप्त करणं, हीच परमे-श्वराची—तो असल्यास—नीति आहे, समजलीस! कुठल्याहि प्राण्याला दुसऱ्याचा जीव घेतल्यावांचून जगतांच येणार नाहीं! 'अहिंसा' हें सृष्टिविरुद्ध तत्त्व आहे! देव बलवन्ताचा पाठीराखा असतो. मग तें शरीरबल असो कीं, बुद्धिबल असो. जपानानं चीनचा लचका तोडून आणि इटलीनं अबिसिनियाचं नरड फोडून हेंच ईश्वरी तत्त्व देखतां डोळा जगाला दाखविलंय्! दुर्बलांना जगांत जगण्याचा हक्कच नसतो! फळ-फळावळं काय किंवा पशुपक्षी काय, सर्वांचा संहार करूनच मनुष्यप्राणी

जवळाय्! इतकंच नव्हे, तर आतांपर्यंतच्या सर्व महात्म्यांनीं हजारो प्राण्यांच्या मांसान्नावर ताव मारूनच देवधर्माच्या, दयेमायेच्या न् नीतीच्या गप्पा झोडल्या आहेत!...'

'महात्माजींनींसुद्धां?'

'हो हो, महात्माजींनींसुद्धां! महात्माजी एक मांस खात नसतील पण फळं खातातच ना? प्रो. बोसनीं वनस्पतीलाही प्राण आहे, वनस्पति हीसुद्धां एक जीवसृष्टि आहे, असा शोध लावून तो सिद्ध करून दाखविलेला आहे. हातांत कुऱ्हाड घेऊन झाड तोडायला निघालं असतांना तें भीतीनं कसं थरथर कांपतं, हें दाखविण्याचीं यन्त्रं त्यांनीं निर्माण केलीं-यत. अर्थात् 'वनस्पत्याहार' हासुद्धां हिंसेच्याच कक्षेंत येतो. जिलबीचं आम्बलेलं पीठ काय असतं? दही म्हणजे काय? दूध म्हणजे तरी काय? कोट्यवधि प्राण्यांचा समुदाय! त्यांना तळून, घुसळून मारल्यावांचून आमचीं पक्वान्नंच तयार होत नाहींत! मोठे प्राणी मेलेले दिसतात, क्षुद्र कीटक दिसत नाहींत, एवढाच काय तो फरक!'

'मग तुमचं म्हणणं तरी काय आहे?'

'लोकांचे बंगले बेलाशक धुळीला मिळवून आपले वाडे उठवायला कांहीं हरकत नाहीं! नीतीच्या कल्पना या कृत्रिम आहेत. साधेल तितका स्वार्थ साधणं, हीच नैसर्गिक भावना आहे. आपला डाव साधून आपला तळीराम गार व्हावा, म्हणून भोळयाभाबड्या लोकांच्या डोळयांत धूळ फेंकण्याकरितांच, लुच्च्या लोकांनीं या नीतीच्या कल्पना आपल्या सुपीक मेन्दूतून काढल्या आहेत. निसर्गानं निर्माण केलेल्या सम्पत्तीवर कांहीं एखाद्या विशिष्ट व्यक्तीचाच हक्क नाहीं. ज्याला लुबाडतां येईल, त्यानं ती बेलाशक लुबाडावी, चैन करावी आणि एखाद्या दिवशीं आयुष्य सम्पल्यावर जगाला लाथ मारून अज्ञात जगांत चालतं व्हावं!'

'अन् देवानं शिक्षा केली तर?'

'देवो दुर्बलघातकः। हजारों उण्ट, गाई, बकरीं, मेण्ढ्या, कोम्बडीं मटकावणाऱ्या देवाला आम्हांला शिक्षा करण्याचा काय अधिकार आहे? अन् देवाचं स्वरूप तरी अजून नक्की कुठं ठरलंय्?

प्रत्येक देशांत देव निराळा आहे, आणि हिंदुस्थानांत तर वेद-कालापासून आतांपर्यन्त देवाचीं स्वरूपं सारखीं बदलताहेत! देवाचा हाच जगाला सन्देश आहे. 'प्राण्या! दुसऱ्याच्या रक्तमांसावर खुशाल आपलं रक्त-मांस वाढीव!'

'तुमची ही फिलॉसफी ऐकून अंगावर तर कांटाच उभा राहतो!'

'करतांना करतां न् बोलतांना कां लाज?—म्हणून म्हणतों, तुझं सौन्दर्य विकून मी पैसा मिळवतों–देह तरी नाहींना विकीत?—'

'इतकं करायला तयार झालेले तुम्ही तें सुद्धां कराल!'

'ऐक, तुझं सौन्दर्य विकून पैसा मिळवितों न् दोघं चैन करतों, यांत कांहीं वावगं नाहीं. आपण जसा कलेवर, गोड गळ्यावर, हुषारीवर पैसा मिळवतों, तसंच हें. कुलीन, सुशिक्षित सिनेमा नटी तरी काय करतात? तुझ्यासारखा सौन्दर्यावरच पैसा मिळवितात ना? फ्रान्स-मधल्या तरुणी आपले सुन्दर केंस कापून देऊन पैसे मिळवितात, तर कित्येक आपले हवे तसले फोटो देऊन मिळवितात. तसंच हें. तुझ्या सौन्दर्याचा दिग्विजय आहे हा! शेकडो वेडप्यांना आपल्या नादीं लावून तूं आपल्या पायाशीं लोळवतेयूस, हें तुझं सामर्थ्य तूं कमी समजूं नकोस!—' ही शेवटची विक्रमाची मात्रा मात्र छबूच्या मनावर अचूक लागूं पडली. कारण ती एकदम मनापासून हांसली आणि तिनें प्रेमभरानें त्याला कड-कडून मिठी मारली.

आणखी कांहीं तो बोलणार, इतक्यांत त्याला बाहेरून कोणीतरी हांका मारल्या, 'अहो, त्रिविक्रमपन्त! आंत आहांत का? येऊं का आम्ही? कांहीं बिघडणार नाहीं ना?'

हे शब्द ऐकतांच दोघें दोहों बाजूस झालीं आणि त्रिविक्रमपन्त म्हणाले 'या अवश्य या!'

त्यांची आज्ञा मिळतांच सर्वोत्तम, श्रीनिवास व जगदीश असे तिघेजण आंत आले आणि त्या दोघांच्यासमोर खुर्च्या ओढून बसले.

'वाः आमच्या गुलछबूताईनीं खूपच थाट केलाय् कीं! आजच्या

पातळाचा कलर खूपच मारू दिसतोय् बुवा!' असें म्हणून सर्वोत्तमानें तिचें पातळ हातांत घेऊन पाहिलें!

'सर्वांनाच समाधान वाटेल, असं कांहीं तरी करायचं न् दुसरं काय?' तिरप्या नजरेनें त्याच्याकडे पाहात व स्मित करीत छबू म्हणाली.

'काल रात्रभर आम्ही इथें मौज केली, पण—' सर्वोत्तम म्हणाला, 'आमच्या तिला संशय येऊन तिनं आज आमची खूपच हजेरी घेतली! आमचं बरंचसं बेण्ड बाहेर फुटलेलं दिसतंय्! या जगदीशाची साक्ष काढून तर तिनं आम्हांला चांगलंच गप्प बसवलं!'

'अन् आमचीलासुद्धां संशय आलाय्!' श्रीनिवास म्हणाला, 'आज सबन्ध दिवसभर खटका सुरू आहे. आज सन्ध्याकाळीं ऑफीसमधून आल्यानन्तर आमच्या हिनं, माझ्याबरोबर या सर्वोत्तमालाही पुष्पांजली वाहिली. मग तें प्रकरण मिटवतां मिटवतां माझ्या नाकीं नऊ आले!'

'अन् आमच्या घरीं तरी काय आज असंच झालं! आमची आहे थोडीशीं भोळी. तिला कांही संशय आला नव्हता. छबूताई, तुम्हाला तुमच्या फोटोचा एन्‌लार्ज करून द्यायचं कबूल केलं होतं, पण तुम्ही इतकी घाई कराल अशी माझी कल्पना नव्हती. मी दोनप्रहरीं चार वाजतां सर्वोत्तमाच्या घरीं सहज गेलों न् तुम्हीं इकडे तो फोटो न् पत्र आमच्या घरीं पाठविलंत. आमच्या गैरहजेरींत तें पडलं आमच्या पत्नीच्या हातांत. आणि मग जो कांहीं गहजब झालाय्, तो कांहीं विचारूं नका! 'छबूताई' अशी तुम्ही सही केली होती. तेवढ्यावर आमची अब्रू बचावली. नाहीं तर आला होता कठिण प्रसंग!'

'अय्या! असं होईल अशी माझी कल्पना नव्हती!' छबू थोडीशी घाबरून म्हणाली, 'एवढ्यावरच निभावलं ना?'

'मला वाटतं,' पन्त म्हणाले, 'आतां यापुढं तुम्ही तिघांनीं आपल्या बायकांना संशय न येईल, असं वागावं, हें उत्तम! थापा मारायच्या झाल्या, तरी सर्वांची एकवाक्यता होईल, असं आधीं कांहीं ठरवीत चला. नाहीं, तुम्ही इथें येऊन कांहीं गैर करतां, अशांतला

भाग नाहीं. तरी पण संसारांतल्या सहचारिणीला विनाकारण कां दुखवा ? त्यांच्यांसम्बन्धानं तुम्ही कांहीं तरी लग्नांत शपथ घेतलेली आहेच कीं, नाहीं ?

' आजच्या अनुभवावरून तरी ' सर्वोत्तम म्हणाला, ' तुमचं म्हणणं आम्हांला खरं वाटूं लागलंय्. आतां यापुढें आम्ही चांगलीच खबरदारी घेणार ! काय, श्री, जगदीश, खरं कीं, नाहीं ? '

' अलबत ! ' दोघांनींही माना डोलविल्या.

' कांहीं गरम गरम आणूं कां ? ' पन्तांनीं नम्रपणें विचारलें. '

' कशाला ? ' श्रीनिवास म्हणाला, आतां तर घरीं जेवायचंय् ! '

' किशा ! ' छबूनें मंजुळ स्वरानें पुकारलें, ' थोडीं गरम भजीं, शेव न् स्पेशल चहा घेऊन ये बरं ! ' आतां मात्र ' नको ' म्हणण्याची कुणाची छाती होईना.

आणखी कांहीं गोष्टी होतात न होतात तोंच सर्व साहित्यासह किशा आला. सर्वांनीं त्या जिनसांवर यथेच्छ ताव मारला. चहा प्याल्यानंतर श्रीनिवास व जगदीश आपआपले खिसे चांचपूं लागले, तों झटकन् सर्वोत्तमानें एक पांचाची नोट काढली आणि छबूच्या हाताला स्पर्श करून ती त्यावर ठेविली आणि प्रसन्न मुद्रेनें त्या तिघांनीं त्या जोडप्याचा निरोप घेतला.

---

# १५ : भोळी बिचारी चित्रा !

'चित्रा ! ए चित्रा !'

'कोण आहे तें ?'

'अग मी तुझा तो !'

एक नवयौवना दार उघडून बाहेर आली आणि हांसत म्हणाली, 'आपण का आलां माझे ते ? यायचं. सुस्वागतम् ! तयार आहे बरं आंत चहा–शिरा–उप्पीटम् !' असें म्हणून तिनें त्याचा हात धरला आणि ती त्याला आंत घेऊन गेली.

आंत जातांच जगदीशनें कपडे काढले. चित्रेनें मोरीवर पाट माण्डून टूथपेस्ट, ब्रश, साबण व टॉवेल आणून ठेवला. त्यानें दन्तधावनाचा समारम्भ आटोपला आणि तो शिऱ्या–उप्पीटावर ताव मारण्याच्या तयारीनें बैठकीवर बसला. चित्राही सर्व खाद्यपेयांच्या सामुग्रीसह येऊन त्याच्या समोर बसली आणि त्याच्याकडे पाहात, हांसत म्हणाली, 'स्वारी आत्तां येईल ही माझी कल्पनाच होती. म्हणून मी हें आधीं चटकन् करून ठेवलं. स्वारी कुठें होती रात्रभर ?'

'तो सर्वोत्तम न् जगदीश आहेना ? त्यांनीं अडकवून ठेवलंना मला गेली आख्खी रात्र ! मी 'नको नको' म्हणत असतां मला सिनेमाला नेलं. तिथून नेलं त्या गोविन्दरावाच्याकडे न् तिथें माण्डला ब्रिझिकचा डाव. मला तर असं झालं होतं कीं, केव्हां एकदां घराकडे येईन. माझी इकडे येण्याची आतुरता पाहून त्यांनीं जास्तच वात्रटपणा चालविला. चांगला दब्बल पहाटे पांचापर्यन्त डाव चालविला न् नन्तर कॉफिबिफीचा समारम्भ करून आत्तां सहाला आमची सुटका केली !— माझा कांहींच पत्ता नाहीं, असं पाहून तूं नाहींना घाबरून गेलीस ?'

‘ थोडीशी भ्यालें ’ चित्रा म्हणाली, ‘ पण लागलीच मनाला धीर आला. म्हटलं, स्वारी कांहीं लहान नाहीं. असेल कुठें तरी स्नेह्यासोबत्याच्या घरीं ! ’

शिरा सम्पवून उप्पीटाची बशी आपल्याकडे ओढीत असतां जगदीश म्हणाला, ‘ आणखी नाहींना माझ्याबद्दल कांहीं भलता सलता संशय आला ? ’

‘ छे छे ! हें काय हें ? मी सुदैवाची म्हणून तर इकडची स्वारी मला लाभली ना ? ’ असें म्हणून तिनें त्याच्याकडे कृतज्ञतापूर्ण प्रेमळ दृष्टीनें पाहिलें. तिच्या दृष्टीला दृष्टि भिडतांच जगदीशाचें अन्तःकरण थरारून त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. इतक्यांत हलकेंच, अदृश्यपणें त्याच्या कानांत कोणी तरी विचारलें, ‘ जगदीश ! तूं अव्याज मनोहर, प्रेमळ चित्रेचा–एका भोळया भाबड्या जिवाचा केवढा भयंकर विश्वासघात करीत आहेस ? ’ ‘ छे छे ! ’ त्यानें बेभान स्थितींत एकदम मोठ्यानें उत्तर दिलें.

‘ छेः छेः ! छे छे काय ? ’ हांसत चित्रेनें विचारलें.

‘ तसं नव्हे. म्हटलं, तूंही सुरू करना ! का तुला मी भरवूं ? ’

‘ आपण उप्पीट खावं. मी खातेय् इकडे शिरा. ’ असें म्हणून ती शिरा खाऊं लागली. ‘ बरं आजचे जिन्नस कसे काय झालेत ? ’

‘ वाः तूं गोड, तुझा हात गोड, तुझं मन गोड, मग हें जिन्नसही ‘ गोड गोड ’ कां होणार नाहींत ? चहा तर नुसता अमृत बनलाय् ! सध्यां सहचारिणीला कोणतंही पक्वान्न आलं नाहीं तरी प्रत्यवाय नाहीं, पण मुख्यतः चहा आला पाहिजे ! तो उत्कृष्ट आला कीं, संसार बहारीचा झालाच म्हणून समज ! ’ असें म्हणून त्यानें चहाचा कप रिकामा केला. इकडे चित्रेनेंही आपला चहा सम्पविला.

‘ आपले जसे क्लब आहेत तसा आम्ही मैत्रिणी मिळून एक क्लब काढूं का ? ’

‘ शहरांत लेडीज क्लब आहेना ! त्यांतच ‘ जॉईन ’ हो म्हणजे झालं ! ’

'छेः बाई ! तो फारच श्रीमन्त, मोटारवाल्याबाईचा आहे ! आमचा आपला मध्यम स्थितींतल्या बायकांचा असणार !'

'काढा, पण रात्र रात्रभर राहायला मिळणार नाहीं, तिकडे !'

'तें का ? मग तुम्ही पुरुष राहतां तें ?'

'पुरुषांची गोष्ट वेगळी आहे !'

'अगबाई ! पण गळ्यांतला बदाम काय झाला ?' त्याच्या गळ्याकडे लक्ष्य जातांच ती घाबरून म्हणाली, 'कुठं पडला बिडला नाहीं ना ?'

बदामाचें नांव काढतांच जगदीशाचा चेहरा खर्रकन् उतरला. वास्तविक बदामानें चार दिवसांपूर्वीच सराफाचें दुकान पाहिलें होतें परन्तु चित्रेचें मात्र त्याच्या सावधगिरीमुळें त्याकडे आतांपर्यन्त लक्ष्य गेलें नव्हतें. या चार दिवसांत, तिनें बदमाबद्दल विचारलें, तर काय उत्तर द्यायचें हें त्यानें आगाऊ ठरवून ठेवलें होतेंच. परन्तु तो निढावलेला पक्का बदमाष नसल्यामुळें तिच्या अचानक प्रश्नानें त्याच्या मनावर परिणाम झाला इतकेंच. तो आपल्या भाषेंत सहजपणा आणण्याचा प्रयत्न करीत म्हणाला, 'सोन्याचा बदाम ना ? अग, त्याची साखळी तुटली म्हणून तो नीट करायला सोनाराकडे टाकलाय्. आतां लावील पन्धरावीस दिवस तो खण्ड्या सोनार ! सोनं महाग झाल्यामुळं 'काम नाहीं' म्हणून आधीं लेकाचे ओरडत असतात. पण काम दिलं, तर वेळेवर देतील तर शपथ !'

'मग कांहीं हरकत नाहीं. नाहीं तर म्हटलं, कुठें पडला बिडला कीं, काय ? बाकी आपल्या गळ्याला तो फारच शोभत होता हो ! सारखं पाहत बसावंसं वाटे !'

'छेः छेः ! बायकांच्या गळ्यांत जसे दागिने शोभतात, तसे पुरुषांना मुळींच शोभत नाहींत ! सौन्दर्याच्या शिखरावर सोन्याचा कळस बसविला कीं, त्याला मनोहारित्व येणारच !' जगदीश मिस्किलपणें हांसत म्हणाला. तेव्हां चित्रा म्हणते 'चला जा ! तुम्ही आतांशा फारच चावट व्हायला लागलांत !'

रात्रीचें जागरण झाल्यामुळें तेलाचें मालीश करून गरम पाण्यानें स्नान करतांना जगदीशाला अतिशय आनन्द झाला. स्नान आटोपतांच तर त्याला झोंप येऊं लागली. जेवणाची वेळ झाली तशी तो पाटावर बसला, पण त्याला झोंप न आवरल्यामुळें तो पेंगूं लागला. तेव्हां चित्रा त्याची नानाप्रकारें चेष्टा करूं लागली. तिनें चेष्टा केली, टाळ्या वाजविल्या कीं, त्यानें डोळे उघडावें, हांसावें दोन घांस खावे आणि पुन्हा पेंगूं लागावें, असा प्रकार चालला होता. एकन्दरींत तो आज झोंपेंतच जेवला, असें म्हणावयास हरकत नाहीं. त्याचें आंचवणें होतें न होतें तोंच, तिनें चटदिशीं हात धुवून त्याला बिछाना पसरून दिला. तिनें दिलेला विडा चघळून व सिगारचे एक दोन झुरके मारून स्वारीनें शय्येवर जी लोळण मारली, ती तब्बल दोनप्रहरचे चार वाजेपर्यन्त !

चार वाजतां स्वारीनें डोळे उघडले आणि आपल्या प्रियपत्नीला हाक मारली, ' चित्रा ! '

' आहे, तयार आहे चहा ! उठायचं होतं !'

' शाब्बास ! याच नांव बायको ! ' असें म्हणून तो एकदम उठला, त्यानें चूळ भरली आणि तिनें तयार केलेला तो लज्जतदार चहा प्राशन केला. आतां त्याला पूर्ण हुषारी आली. त्यानें कपडे चढविले आणि तिच्या सफरचन्दासारख्या टचटचीत व गुबगुबीत गालावर टिचकी मारून तो म्हणाला, ' मी सर्वोत्तमाकडे जाऊन येतो हं. थोडसं काम आहे. स्टूडियोकडे कोणी आलं तर बसायला सांग. या जागरणानं आजचं सारं वर्कही राह्यलं ! बऱ्याच जणांच्या कॉपीज द्यायच्या होत्या !' असें म्हणून तो निघून गेला.

सर्वोत्तमाच्या घरीं जातांच सुरेखनें त्याची साक्ष कशी काढली आणि आपल्या पतीची फजिती कशी केली, तें पहिल्या व तिसऱ्या प्रकरणांत येऊन गेलेंच आहे. आतां इकडे पुढें काय झालें तें पाहूं.

जगदीशाला जाऊन पांचदहा मिनिटें होतात न होताव तोंच ' मोहनमन्दिरा ' तील पोऱ्या किशा एक फोटो व एक पत्र घेऊन जगदीशरावांचें नांव पुकारीत आला.

'फोटोग्राफर जगदीशराव आहेत का?'

'नाहीं. बाहेर गेलेत. काय काम आहे? तुमचं नांव काय?'

'माझं नांव कृष्णराव. मी मोहनमन्दिरांत मॅनेजर आहे चाळीस रुपयांवर! त्यांना हा फोटो न् पाकीट द्यायला आलोंय्. तुम्ही कोण त्यांच्या?'

'मी त्यांची पत्नी!'

'होय का? मग तुमच्याजवळ द्यायला कांहीं हरकत नाहीं.' असें म्हणून त्यानें तो फोटो आणि बन्द लखोटा तिच्या स्वाधीन केला. 'या फोटोचा मोठा फोटो करायचाय्! यांनींच पाठविलाय्. द्या हं त्यांच्या-जवळ. विसरूं नका!' किशा ऐटींत म्हणाला.

'या बाई कोण हो? कुणाचा फोटो हा?'

'म्हणजे? तुम्हाला माहीत नाहीं का? या आमच्या मालकीणबाई गुल्—नव्हे—छबूताई! यांच्यामुळंच तर आमचं हॉटेल एक वर्षाच्या आंतच भरभराटीला आलं! फारच हुषार आहेत या! शहरांतली सारीं हॉटेलं चीत मेल्यामुळं सारे त्वंपुरा करताहेत आमच्या नांवानं!'

किशा निघून गेला. चित्रा त्या नखरेल स्त्रीकडे निरखून पाहूं लागली. 'असलीं मादक मोहिनी दृष्टीला पडल्यावर पुरुष वेडे व्हायला काय उशीर?' ती मनांत म्हणाली; पण तिला आपल्या पतीबद्दल मात्र संशय आला नाहीं. कारण धन्द्यानिमित्तानें असल्या किती तरी भानगडी जगदीशाकडे येत असत. पण इतक्यांत तिचें लक्ष त्या बन्द लखोट्याकडे गेलें. तिनें तो सहज फोडला आणि वाचला. त्यांत पुढीलप्रमाणें मजकूर होता. 'प्रिय जगदीशराव यांस नमस्कार. आपण सांगितल्याप्रमाणें फोटो पाठविला आहे. तर सिपियाकलरमध्यें त्याचा एन्लार्ज करून लवकर पाठवून द्यावा. आपली प्रिय छबूताई.' हें पत्र वाचतांच तिच्या अंगाचा तिळपापड उडाला. तिला एकदम आपल्या पतीचा जबरदस्त संशय आला. या गुलछबूच्या जाळ्यांत खाशीनं आपला पति सांपडला, असें तिला वाटूं लागलें. आतां ती एकेक गोष्टीची मागली जुळवूं लागली. कालच्या रात्रीचें आगमन हा त्या मालिकेतील नवाच पुरावा होता. कारण अशीं कारणें गेल्या महिन्यांत दोन तीन झालीं होतीं. तिला चैन पडेना. तिनें तें

पत्र दहा वेळां तरी वाचलें असेल. आणि पंचवीस वेळा तरी मत्सरानें त्या फोटोकडे पाहिलें असेल. शेवटीं तिनें तो रागानें समोरच्या भिन्ती-वर ताडकन् आपटला आणि स्वतःचें मन शान्त करण्याकरितां म्हणून ती कुठें तरी जवळच्या देवळांत बसण्याकरितां निघाली.

तिनें ब्लाऊज बदलण्याकरितां म्हणून कपाट उघडलें. ब्लाऊज बदलला. सहज दागिन्यांचा डबा उघडून पाहिला, तो त्यांत सोन्याच्या गोटांपैकीं एक गोट कमी! त्याबरोबर तिच्या पोटांत चर्रर्र झालें. साख-ळीचा एकेक दुवा वाढूं लागला. तिनें बत्ती पेटवून सारें घर शोधलें, पण गोटाचा पत्ता नाहीं! नाहीं म्हणायला तिला एक चमत्कारिक बिल मात्र सांपडलें. 'लक्ष्मीनारायण आणि कम्पनी' या कापड दुकानाचें होतें तें.

जगदीशानें दोनशें रुपयांचा एक शालू घेतला होता. एकशें ऐंशी रुपये दिले होते. वीस द्यायचे होते. आणखी एक दुवा सांपडला. ती मनांत म्हणाली, 'हा बनारसी शालू तर चार दिवसांखालीं घेतलेला दिसतोय्, पण कधीं आणलाय् घरीं? डोळ्यांनीं पाह्यलासुद्धां नाहीं मी! म्हणजे, गळ्यांतला बदाम, माझा गोट, हें शालूचं बिल नी ही बया यांचा कांहीं परस्पर सम्बन्ध आहे कीं काय?'

तिनें दिवा मालवला, दाराला कुलूप लावलें आणि खात्री करून घेण्याकरितां ती तें बिल घेऊन तडक 'लक्ष्मीनारायण आणि कम्पनी'च्या दुकानीं गेली. आणि तिनें मुनीमाला विचारलें, 'हें बिल तुमचंच काय?'

'होय. आमचंच. चार दिवसांपूर्वी जगदीशरावांनीं शालू नेलाय्. अजून वीस रुपये द्यायचे आहेत. आपण आणले आहेत का देण्याकरितां?'

'नाहीं. सहज विचारायला आलें होतें.' असें म्हणून ती झट-क्यानें परतली आणि आपल्या घराकडे आली. तिनें पुढील दार पुढें केलें आणि बिछाना पसरून त्यावर ती धाडदिशी पडली आणि स्फुन्दून स्फुन्दून रडूं लागली.

चित्रा मनाची फार कोमल होती. आपला सौभाग्यदेव एका

चाण्डाळणीच्या मोहपाशांत सांपडला, याचें तिच्या जिव्हारीं फार लागलें होतें. लग्न झाल्यापासून ही कल्पनाही तिला माहीत नव्हती. अजमासे साडेपांच, पावणेसहाच्या सुमारास जगदीश सर्वोत्तमाच्या घराकडून आला. त्याची चाहूल लागतांच चित्रा ताडकन उठली आणि तिनें धांवतच जाऊन जगदीशाच्या गळ्याला कडकडून मिठी मारली आणि त्याच्या वक्षःस्थलावर मान टाकून ती मोठमोठ्यानें हुन्दके देऊन रडूं लागली.

जगदीशानें आपल्या हातरुमालानें तिचे डोळे पुसले आणि घाबरलेल्या आवाजानें तो म्हणाला, ‘ चित्रा! चित्रा! काय झालं तुला? कां तूं रडतेस?’

‘ नाहीं नाहीं! मी आपल्याला त्या कवटाळणीच्या पाशांत कधींही जाऊं देणार नाहीं!’ चित्रा स्फुन्दत म्हणाली.

‘ सांग ना काय झालं?’

चित्रा धावत स्टूडियोकडे गेली. तिनें छबूचा फोटो आणि पत्र आणलें. त्याच्यापुढें तो फोटो धरून ती म्हणाली, ‘ ही कोण?—सांगा गडे!—ही कोण?—जलदी सांगा!’

तो फोटो पाहतांच जगदीश अन्तरीं दचकला. परन्तु वरून तसें न दाखवितां तो म्हणाला, ‘ ही त्रिविक्रमपन्त हाटेलवाल्याची पत्नी छबूताई! हा फोटो तुझ्याकडे कसा आला?’

‘ हें पत्र न् हा फोटो एक पोऱ्या देऊन गेला. खात्रीनं, गडे, या बाईच्या सम्बन्धांत आपला पाय घसरलाय्! आपण कबूल करा अथवा न करा, पण मी पक्कं ताडलंय् कीं, ही बया आमच्या संसाराचं वाटोळं करायला बसलीय्! दुर्दैवा! तुला आमचा सोन्याचा संसार बघवला नाहीं का रे!’

‘ पण तूं कशावरून म्हणतेस हें?’

‘ गळ्यांतला बदाम न् माझा गोट विकून तुम्ही दोनशें रुपयांचा शालू आणलांत आणि चार दिवसांपूर्वी या बाईला नेऊन दिलांत! हा पाहा त्याचा पुरावा—हें बिल!—अजून वीस रुपये द्यायचे आहेत!—’

' हात्तेच्या ! याचमुळं का माझा तुला संशय आला ?'

' म्हणजे हा पुरावा कांहींच नव्हे का ? '

जगदीश बेफिकिरपणें बोलत होता खरा. पण त्याचें तोंड या बिन-तोड पुराव्यानें काळेंठिक्कर पडलें होतें. तें दिसूं नये म्हणून तो वरचेवर रुमालानें पुसण्याचें निमित्त करीत होता. ' आतां तुला शालूची सारी खरी हकीकत सांगतों. ते आपले ' कांगाव ' चे देशपांडे आहेत ना ? त्यांचा निरोप आला कीं, ' एक दोनशें रुपयांपर्यंत शालू पाठवून द्या ' म्हणून. त्यांच्याइथें कांहीं लग्न आहे वाटतं. तेव्हां तुझा एक गोट मोडला, बदाम विकला, त्याच्या भरतीला जवळची थोडीशी रक्कम घातली आणि तो घेऊन परस्पर पाठवून दिला. स्नेही पडले, नाहीं कसं म्हणायचं ? त्यांच्याकडून रक्कम आली कीं, पुन्हां दागिने करणार ! '

' मग मला कां दाखविला नाहीं तो ? '

' आतां खरं सांगूं तुला ? तुला भ्यालों ! '

' मला ? '

' होय. कदाचित् तो शालू पाहून तुझ्या तोण्डाला पाणी सुटलं नी ' असला शालू मलाही पाहिजे ' असा हट्ट तूं धरून बसलीस तर करा काय ? या भीतीनं मी तो तुला दाखविला नाहीं. तूं शालू नेसलीस, तर तूं मला अधिक सुन्दर दिसशील, अन् तुझीही हौस भागेल, या साऱ्या गोष्टी खऱ्या, पण यावेळीं दोनशें रुपये आणूं कुठले ?—तरी पण तुला एक जरीचं चान्दणी पातळ घेणारच आहे मी ! '

पातळाचें नांव ऐकतांच तशा स्थितींतही तिच्या चेहऱ्यावर हास्य चमकलें.

' आतां या पत्राचा खुलासा करावा ! '

' पत्र उघडच आहे. खुलासा काय करायचा त्यांत ? '

' यांत ' प्रिय जगदीशराव ' असं कसं म्हटलंय् हिनं आपल्याला ? '

' वेडी रे वेडी ! अग, अशी लिहिण्याची हल्लीं पद्धतच आहे मुलीं ! इंग्रजीची नक्कल आहे ही ! '

' अन् खालीं ' आपली छबूताई ' कसं लिहिलंय् तिनं ? आप-

त्याला ‘ आपली ’ म्हणण्याचा काय तिला अधिकार ? नी पुन्हां ‘ प्रिय ’ म्हणतेय्‌च !—नाहीं ग बाई ! यांत कांहींतरी भानगड दिसेतय्‌ ! ’

अग, ‘ आपली,’ ‘ प्रिय ’ म्हटलं म्हणून काय झालं ? पण आपल्या नांवाच्या पुढं हिनं ‘ ताई ’ म्हटलं आहेना ? ‘ ताई ’ कुणाला म्हणतात ? बहिणीला ना ? झालं तर मग ! ती मला बहिणीप्रमाणं आहे ! म्हणूनच तिनं मला ‘ छबूताई ’ म्हटलं आहे. तूं माहेरीं गेल्यावर मला इतकी पत्रं धाडलींस, त्यांत कुठें ‘ आपली चित्राताई ’ म्हटलं नाहींस ग ? कशी सही करीत होतीस ? ‘ आपली लाडकी चित्रा !’ तशी आहे का सही इथं ? ‘ साप साप !’ म्हणून भुई बडविण्याची बायकांना संवयच ! कसे झालों तरी आम्ही फोटोग्राफर. सर्व लोकांशीं आमचा सम्बन्ध येणार. कांहीं स्त्रियांचे फोटो आम्हांला एकान्तांतसुद्धां काढावे लागतात. कांहीं गोषांत जाऊन काढावे लागतात. कांहीं चोरून काढावे लागतात. कित्येक वेळीं स्त्रियांचा—चांगल्या कुलीन स्त्रियांचा ओचाकासोटा आम्हांला नीट करावा लागतो. पदर सावरावा लागतो. बुचड्यावर फुलं खोवावीं लागतात. गालाला, हनुवटीला हात लावून तोण्ड सरळ करावं लागतं, म्हणून का तूं धांवत येऊन माझा हात धरणार ? का या प्रकारांत आमची वाईट वासना असते ? आम्हांला भलतीकडे लक्ष द्यायला वेळ आहे कुठें ? कुणीकडून काम चांगलं होऊन गिऱ्हाइकाची शाबासकी मिळविली, कीं आम्ही मिळवली ! ‘ अतिपरिचयादवज्ञा ! ’ बायकांच्या अंगाला अंग लागलं तरी त्याचं आम्हांला कांहीं वाटत नाहीं !—आतां तरी झालं का मनाचं समाधान ?—चित्रा ! तुला पन्नास पोरींतून निवडून काढली, ती का कुणातरी बाजारबसवीच्या प्रेमपाशांत सांपडून तुझी पायमल्ली करण्याकरितां ?—चित्रा ! तूं माझ्या काळजाचा तुकडा आहेस बरं तुकडा ! ’

‘ पण पुरुषाचं मन चंचल असतं म्हणतात. भुंगा कधीं एका फुलावर ठरलाय्‌ का ? ’

‘ हा भुंग्याचा दोष नाहीं; फुलाचा आहे ! तृप्त होण्याइतका ‘ मधुरस ’ त्याला एकाच फुलांत सांपडेल, तर तो भुंगा सतरा फुलं शोधण्याची यातायात करील कशाला ? पण माझं हें फूल तसं आहे का ?

या फुलाला असं बाहुपाशांत घेतलं नी या गोड अधरसुधेंत तन्मय झालं कीं, आत्मा तृप्त! खरोखर हें माझं भाग्य पाहून एखाद्या सम्राटालासुद्धां माझा हेवा वाटत असेल!'

'तें कांहीं नाहीं. ज्याअर्थी मला आपला संशय आला आहे, त्याअर्थी आतां मी चोवीस तास आपल्याला नजरकैदेंत ठेवणार! कर नाहीं त्याला डर कशाची? आपल्याला 'हं' म्हणायला कांहीं हरकत नाहीं!'

'हरकत नाहीं! खुशाल मला आपल्या बाहूंच्या बन्दीखान्यांत ठेव! मग झालं?'

'आतां मात्र मला धीर आला!' असें म्हणून ती खुल्या दिलानें हांसली. या नन्तरची हकीकत तिसऱ्या प्रकरणांत आलीच आहे.

---

## : ५ : प्रथमची वाटाघाट.

गेल्या चार प्रकरणांत वर्णन केलेल्या गोष्टी एकाच दिवशीं, पण निरनिराळ्या वेळीं घडून आलेल्या आहेत. त्यानन्तर आतां चार पांच दिवसांची हकीकत आम्ही या प्रकरणांत सांगणार आहोंत.

केव्हांही जा, श्यामसुन्दराच्या मन्दिरांत स्त्रीपुरुषांची नेहमीं गर्दी असे. तें देवालय जुनें, भव्य व सुन्दर तर होतेंच, परन्तु शहरांतील सर्व देवालयांत त्या देवालयाला अग्रेसरत्वाचा मान असल्यामुळें त्यांतील सर्वच कार्यक्रम थाटाचे व कुतुहलजनक होत असत. अर्थात् या देवालयांत इतर देवालयांपेक्षां गर्दीही बेफाम जमत असे.

मनुष्यांच्याप्रमाणें देवांच्याही ललाटीं दैवाची स्थापना केली असावी, असें दिसतें. देवापेक्षां दैव एका मात्रेनेंच श्रेष्ठ आहे, असें नव्हे, तर तें कर्तबगारींतही तसेंच आहे. कारण आपण शहरांत शेकडो देवळें बान्धलेलीं पाहतों, पण सर्वच देवांच्या नशीबीं सारखी पूजाअर्चा कुठें असते? एखाद्या देवावर तिन्हीत्रिकाळ पंचामृताचे पखाली पखालीनें अभिषेक होत असतात, तर दुसऱ्या देवाच्या दैवीं साधें स्नान तर नसतेंच, पण दारें उघडीं पडलीं, तर त्यांना कुत्र्या—मांजरांचा दुर्गंधीयुक्त अभिषेकहि सहन करावा लागतो! कित्येक देवांना पंचपक्वान्नांचे ढीगच्या ढीग नैवेद्य दाखविले जातात, तर कित्येकांची सहा सहा महिने एकादशी—शिवरात्र चाललेली असते. कित्येकांची विजेच्या झगझगीत प्रकाशांत पांच पांच तास उत्साहमूर्त सजविली जाते, तर कित्येकांच्या नशीबीं पांच पांच महिने साध्या गोड्या तेलाची मिणमिणती पणतीही येत नाहीं. असेच सर्व

प्रकार. पण आमचा श्यामसुन्दर मात्र नशीबवान देवांपैकीं होता. त्याचें वैभव एखाद्या संस्थानिकाप्रमाणें होतें.

हौशी, गवशी आणि नवशी अशा तिन्ही प्रकारच्या लोकांची या देवालयांत नेहमीं चैनचंगळ चालत असे. अनेक सुन्दर तरुणींचे मुखचन्द्र पाहायला सांपडून, आरतीच्या धकाधकींत किंवा प्रदक्षिणेच्या गर्दीत त्यांच्या अंगांना स्पर्श करायला मिळत असे, हा हौशी लोकांचा लाभ होता. बायकांच्या, मुलांच्या गळ्यांतील दागदागिन्यांवर—निदान पादत्राणांवर तरी—डल्ला मारायला सांपडत असे, हा गवशी लोकांचा लाभ होता; आणि बिचारे अल्पसंख्याक नवशी केवळ देवदर्शन व सोहाळे यांच्याकरितां येत असत. इतर भानगडीकडे त्यांचें लक्ष्यच नसे. ध्यानधारणोपासना हाच त्यांचा लाभ!

संध्याकाळच्या पांचाचा सुमार होता. प्रदक्षिणा घालतां घालतां तीन तरुणींची एकत्र गांठ पडली, कांहीं बोलणीं झालीं आणि प्रदक्षिणा आटोपल्यावर त्या कांहीं गोष्टी करण्याकरितां, सभामंडपाच्या एका कोपऱ्यांत जमल्या व अगदीं जवळ जवळ बसून हळूहळू कांहीं बोलूं लागल्या.

त्या तरुणी दुसऱ्या तिसऱ्या कोणी नसून वाचकांना परिचित असलेल्या सुरेखा, जयश्री व चित्रा याच होत्या.

सुरेखा म्हणाली, 'आपण तिघीजणी इथें एकत्र सहाजिकपणें जमलों, हें छान झालं! नाहीं तरी मी तुम्हां दोघींना भेटण्याकरितां बोलावणारच होतें म्हणा.'

'माझ्याही मनांत तुम्हां दोघींची भेट घेण्याचं होतं!' जयश्री म्हणाली.

'माझ्याही मनांत तसंच होतं!' चित्रा म्हणाली.

'तुम्ही एवढं खूप लक्षांत ठेवा, आम्हां तिघींवर साखाच प्रसंग कोसळलेला आहे! त्याचं निराकरण तिघींनीं मिळून केलं, तरच होईल.'

'तें कसं काय?' चित्रेनें विचारलें.

'चारपांच दिवसांपूर्वी—मला वाटतं गेल्या सोमवारीं रात्रींच—तुम्हा दोघींचे यजमान घरीं होते का?' सुरेखेनें विचारलें.

‘ नव्हते. ’ जयश्री म्हणाली.

‘ नव्हते ? कुठें गेले होते ? काय सांगितलं त्यांनीं ? ’ सुरेखेनें विचारलें.

‘ जॉलीक्लबांत खुदाबक्षाचं गाणं होतं, तिकडे गेले होते म्हणे. ’ जयश्री म्हणाली.

‘ ठीक आहे. जॉलीक्लबांत शोध करूं याचा. ’ सुरेखा म्हणाली, ‘ बरं, चित्राताई, तुमचे यजमान ? ’

‘ आमची स्वारी—’ चित्रा म्हणाली, ‘ तुमच्या न् यांच्या पतिराजांबरोबर सिनेमा पाहून म्हणे त्या गोविन्दरावांच्याकडे ब्रिझिक खेळायला गेली होती.’

‘ पाहा पाहा, किती थापा मारताहेत ते ! ’ सुरेखा जरा रागांत म्हणाली, ‘ आणि आमच्यांनीं सांगितलं कीं, ‘ जगदीशरावांच्या प्रतापचौकांतल्या घरांत ‘ काव्यगायनचर्चा सुरू होती, तिकडे गेलों होतों म्हणून. ’ आहे कीं, नाहीं मौज ? गेल्या सोमवारीं तिघींचेही पति सबन्ध रात्रभर घरीं नव्हते, एवढी गोष्ट खरी. असं गेल्या महिन्यांत तीन चार वेळां झालं ना ? ’

‘ होय.’ त्या दोघी म्हणाल्या.

‘ मी ठाम सांगतें ’ सुरेखा म्हणाली, ‘ आम्हा सर्वांचे पतिराज एकाच ठिकाणीं कुठें तरी गेले असले पाहिजेत. आमचे म्हणतात, ‘ जगदीशरावांच्या घरीं काव्यचर्चा होती; ’ जयश्रीबाईंचे म्हणतात, ‘ क्लबांत गाणं होतं;’ नी चित्राताईंचे म्हणतात, ‘ आमच्यांना नी श्रीनिवासरावांना घेऊन ब्रिझिक खेळत होतों ’ म्हणून; म्हणजे एकाच्या हकीकतीचा संबन्ध दुसऱ्याशीं जुळत नाहीं. खोटं कधीं पचत नाहीं. यावरून यांत कांहींतरी भयंकर भानगड आहे, असं नाहीं का तुम्हांला वाटत ? ’

‘ हो, असा आम्हांला संशय आला आहे ! ’ चित्रा म्हणाली.

‘ सबन्ध रात्रभर आम्ही यांच्या काळजीनं तळमळत पडावं की

यांनीं बाहेर रंग उडवावेत, हें तुम्हांला पसंत आहे काय?' सुरेखेनें निश्चयानें विचारलें.

'नाहीं ग बाई! आम्हाला असलं कधींच पसंत पडणं शक्य नाहीं!' जयश्री म्हणाली, 'त्यातून आमचे कधीं हॉटेलांत जात नव्हते, परंतु तो एक सध्यां त्यांना नाद लागलाय्. त्यामुळं रोज आमच्या घरीं जेवणाच्या वेळीं खटके उडतात! कसाही स्वयपाक करा, त्यांना आपला गोडच लागत नाहीं. मग स्वयपाकाची उमेद तरी कशी राहणार? जेवण होईपर्यंत रोज पसापसाभर तरी माझ्या डोळ्यांतून पाणी जातं! दोन्ही वेळ चाललंय् असं!'

'नी आमच्या घरांतला एकेक दागिना जात चाललाय्!' चित्रा रडकुण्डीला येऊन म्हणाली, 'तुम्ही विचार करा, एकेक दागिना करतांना या दिवसांत किती यातायात पडते ती. पण ते चुटकीसरसे नाहींसे करतांना यांना कांहींसुद्धां वाटत नाहीं! गळ्यांतला दोन तोळ्यांचा बदाम गेला, माझा एक गोट गेला, हातांतली आंगठी गेली! मला वाटतं आमचे ते त्या हॉटेलांतल्या छबूच्या नादाला लागले असावेत. यांनीं तिला दोनशें रुपयांचा शालू खचित घेऊन दिलाय्. आतां पहिल्यासारखं जेवणही नीट चवीनं होत नाहीं.'

'आतां बरोबर कल्पना जुळली.' सुरेखा आनंदानें म्हणाली, 'त्या हॉटेलांतच तिघांनीं सोमवारची रात्र काढली असली पाहिजे. आमचेंहि आतां पूर्वीसारखे घरांत नीटसे जेवीत नाहींत. आमच्या घरचा पैसाहि गुप्तपणें खर्च होत असावासा वाटतं. सावकारींत लाखो रुपयांची उलाढाल होत असल्यामुळं हातांत पैसा भरपूर खेळतोय्. त्यामुळं इतक्यांतच माझ्या दागिन्यांपर्यंत पाळी येणार नाहीं म्हणा. पण असंच चाललं, तर तोही प्रसंग लवकरच आल्यावांचून राहणार नाहीं!—बरं, केव्हां केव्हां तुमच्या पतिराजांच्या श्वासोच्छ्वासाला कसली तरी आम्बट—स्पष्टच विचारतें दारूची घाण येते का?'

'हो, मला असा संशय आलाय् खरा.' जयश्री नाक मुरडून म्हणाली.

'मलाही आलाय्!' चित्रेनें दुजोरा दिला.

'झालं तर मग. हॉटेलचं गलिच्छ खाणं, मद्यपान नी वेश्यामोह या आयुष्याची धुळधाण उडविणाऱ्या तिकाटण्यांत हे तिघेही खचित सांपडलेत!—आणि इतक्या सर्व गोष्टी असल्यावर त्यांत चौथा चांडाळ जुगार नसेल म्हणतां?'

'अगबाई ग!' घाबरून चित्रा म्हणाली, 'नी मग?'

'मग काय?' जयश्री म्हणाली, 'यावर कांहीं तरी उपाय काढलाच पाह्यजे!'

'यावर तुम्ही काय करायचं ठरविलं आहे?' सुरेखेनें विचारलें.

या संकटाची आम्हाला नीटशी कल्पना नसल्यामुळें याबद्दल आम्ही कांहीं तसं नक्की ठरवलं नाहीं.' जयश्री म्हणाली.

'यावर उपाय तरी काय करायचा आम्ही बायकांनीं? नशिबीं असेल तें भोगणं भाग आहे.' कपाळाला हात लावून खिन्नपणें चित्रा म्हणाली.

'छेः छेः, आतां असं म्हणून भागणार नाहीं. मग आम्ही शिक्षण घेतल्याचा नी वर्तमानपत्रं वाचल्याचा फायदा काय?' सुरेखा गंभीरपणें म्हणाली, 'याचा नक्की शोध लावून यावर कांहीं तरी उपाय काढलाच पाह्यजे. चित्राताई, कपाळाला हात लावून बसण्याचे ते दिवस गेले म्हटलं. आतां आमच्या आम्हींच जर जागरूक राह्यलों, तर आमची कांहींतरी धडगत आहे. या बाबतींत पुरुषांची पाहा कशी एकी असते ती! बायकांना छळण्यांत सारे पुरुष तेवढे मेले एक. कुणी कुणाची निन्दा करीत नाहीं. पुरुषांना ताळ्यावर आणतांना तोच धडा आम्ही बायकांनीं गिरविला पाह्यजे. एक रात्र आम्ही बायका कुठें बाहेर राह्यलों असतों नी अशी थापाथापी चालविली असती, तर आमच्या पुरुषांनीं आकाशपाताळ एक केलं असतं. परवां तर म्हणे, मुम्बईला एका हॉटेलांत एक रात्र आपली पत्नी राह्यली, म्हणून तिच्या नवऱ्यानं आत्महत्या केली! मग आम्हीं काय करावं? कांहींही करून यांना आम्ही व्यसनांतून सोडवलंच पाह्यजे. तुमचे पति तुम्हांला हवे आहेत ना?'

'हें काय विचारणं सुरेखाताई ?' जयश्री म्हणाली, 'आमची आमच्यांच्यावर खरीखुरी प्रीति आहे हो!'

'नी आमचे सुद्धां माझ्याशीं गेल्या महिन्याच्या आधींपर्यन्त अतिशय प्रेमानं वागत होते.' चित्रा म्हणाली.

'म्हणजे' सुरेखा म्हणाली, 'सर्वांची सर्वांवर प्रीति आहे, ही गोष्ट नक्की. केवळ हें मधेंच आगन्तुक संकट आलंय्; पाणी स्वच्छ आहे, फक्त त्यावर शेवाळ जमलंय्; असंच ना तुमचं म्हणणं? ठीक आहे. काढूंया यावर कांहींतरी उपाय!'

'पण आम्हां सर्वांच्या स्वाऱ्या खऱ्याच व्यसनांत सांपडल्या आहेत कीं, आम्ही साऱ्या जणी संशयानं कांहीं तरीच करीत चाललों आहोंत, याचा आधीं विचार केला पाह्यजे.' जयश्री जरा विचार करून म्हणाली.

'पूर्ण विचार करूनच या भानगडींत पडूं.' सुरेखा म्हणाली.

'हॉटेलचा मॅनेजर कृष्णराव आहेना, तो आहे माझ्या थोडासा ओळखीचा.' चित्रा म्हणाली, 'त्याला कांहीं प्रश्न विचारले, तर बऱ्याच गोष्टींवर प्रकाश पडेल, असं मला वाटतं.'

'ठीक आहे. त्याची भेट घेऊं नी माहिती काढूं. समजा, आमच्या कल्पनेप्रमाणं आमचे पतिराज या व्यसनांत गुरफटले आहेत, असं सिद्ध झालं तर तुम्ही काय करणार?'

'आम्ही तुम्हाला पुढारी करूं. तुम्ही सांगाल तसं ऐकूं.' जयश्री म्हणाली.

'माझंही म्हणणं जयश्रीबाईंच्या सारखंच आहे.' चित्रा म्हणाली.

'फार छान! तुम्ही देवासमोर बसून असं सांगताहांत, हें फार चांगलं झालं!' सुरेखा म्हणाली, 'वेड्या भगिनींनो! आपल्यावर काय संकट कोसळूं पाहातंय्, याची तुम्हांला कल्पना नाहीं. आतां कुठें संकटाला आरम्भ होतोय्, म्हणून तुम्हाला तें जाणवत नाहीं. पण पुढें तुमचे हाल कुत्रासुद्धां खाणार नाहीं, समजलांत! सध्यां तुम्ही पतिप्रेमाच्या सांवलीखालीं बसून आनन्दानं संसारसुखाचं अमृत प्राशन करताहांत. पण तुमच्या सौभाग्यमन्दिराला जमीनदोस्त करण्याकरितां केवढी

मोठी घूस लागलीय्, याचा तुम्ही अवश्य शोध करून तिचा सत्यानाश करण्याची खटपट करायला नको का? दारू, वेश्या नी जुगार यांच्या घावांत आमची लक्षावधि रुपयांची असलेली सम्पत्ति बघतां बघता नाहींशी होऊन, आमच्या हातांत भिकेचं परटं केव्हां येईल, याचा नियम नाहीं, अशी मला क्षणोक्षणीं भीति वाटून माझ्या अन्तःकरणाचा थरकांप होतोय्! गर्भश्रीमंताची मी मुलगी, गर्भश्रीमन्ताची मी सून, गर्भश्रीमन्ताची मी पत्नी, असं असूनही मी इतकी भितेंय्, तर तुमची काय अवस्था होईल नी तुम्ही किती भ्यालं पाहिजे? मी गरीबीलाही भीत नाहीं नी गरीबी म्हणजे कमीपणाही समजत नाहीं. नवराबायकोंत अव्यभिचारी प्रेम असेल, तर मीठभाकरीचा संसारही सुखाचा होतो, नी झोंपडीलाही राजवाड्याची शोभा येते. पण ती गरीबी मूळची असावी. व्यसनांनीं आलेली नसावी. नाहींतर जिथें 'फुलं वेंचलीं, तिथें गोंवऱ्या वेंचण्याचा प्रसंग' येतो! मूळचा गरीब असेल तर त्याला गरीबीचं दुःख तरी कसलं होणार? पण श्रीमन्ताचा गरीब झाला, तर त्याचे हाल विचारूं नका. त्यावेळीं वैभवांतले दिवस आठवतात नी गरीबींतल्या दुःखाचे चटके अधिकच बसूं लागतात. पण एवढं एकच संकट आपल्यावर कोसळेल, असं तुम्ही समजूं नका. एकवेळ हें संकट पुरवेल, पण याच्याही पुढचीं संकटं फारच भयंकर आहेत. मग समाजानं नवऱ्यांना दिलेले शिव्याशाप मुकाट्यानं ऐकावे लागतील. अब्रूपरी अब्रू जाऊन घरादारांचे लिलांव डोळयासमोर होतील. ज्या आपल्या मुली चांगल्या घरीं पडायच्या त्यांना वाटेल त्या ठिकाणीं लोटावं लागेल. सोन्यासारखे मुलगे भिकेला लाग-तील. रोज खटके उडून लाथाबुक्यांचा मार खावा लागेल. नवऱ्यांच्या हातापायांत खळखळलेल्या शृंखला, पाण्यानं भरलेल्या डोळयांनीं पहाव्या लागतील. प्रसंगीं खून होतील.आत्महत्या होतील. शीलावर दरवडे पडतील!'

'अगबाई ग! देवा श्यामसुन्दरा! तुलाच रे बाबा, आमची काळजी' हात जोडून डोळयांत पाणी आणून चित्रा म्हणाली.

'इतक्या थरावर गोष्टी जातील म्हणतां?' भिऊन जयश्रीनें विचारलें.

'खात्रीनं!–विचार करा. जगाकडे पाहा. पण आपण त्वरा करून सावधगिरी बाळगिली, तर मात्र असले प्रकार होणार नाहींत.' सुरेखा म्हणाली, 'आपली चाण्डाळचैन चालविण्याकरितां हे पुरुष आपल्या बायकांचीही वाटेल तशी विल्हेवाट करायला मागं पुढं पाहात नाहींत. एवढा मोठा धर्मराज, पण त्यानंसुद्धां जुगारांत बायकोला पणाला लावली. मग इतरांची काय कथा?—परवां त्या वसन्तरावानं काय केलं माहीत आहे ना तुम्हाला?'

'हो, मी त्याची कांहीं तरी भानगड ऐकतेय् खरी!' चित्रा म्हणाली.

'काय केलं त्यानं? जयश्रीनें विचारलें.

'वसन्तरावाला लागला दारूचा नाद. घरचे पैसे सम्पले. इस्टेटीची राखरांगोळी झाली. राहली एक रूपवती बायको. शेवटीं त्याच्या सुपीक डोक्यांत अशी कल्पना आली कीं, श्रीमन्त, गुलहौशी तरुणांना आपल्या पत्नीचा देह विकून आपली चैन चालवावी; नी त्याप्रमाणं तो मेला आपल्या पत्नीला तसं करायला सांगूं लागला. शेवटीं त्याचं पर्यवसान असं झालं कीं, तिनं अब्रूकरतां अंगावर रॉकेल ओतून जीव दिला! पाह्यलंत, पुरुष किती उलट्या काळजाचे असतात ते!—याकरितां म्हणतें, आम्हां तिघींचे पति मित्रमित्र असून एकजुटीनं व्यसनांत गुरफटले आहेत, तर आतां आम्ही तिघींनीं एकजुटीनंच याचा प्रतिकार केला पाह्यजे. नुसतं मुळुमुळू रडत बसून चालणार नाहीं!'

'मी श्यामसुन्दराला साक्षी ठेवून सांगतें कीं, सुरेखाताई, तुम्ही सांगाल तें ऐकायला मी तयार आहे!' असें म्हणून जयश्रीनें सुरेखेच्या हातावर वचन दिलें.

'देवाला साक्षी ठेवून मीही तुम्हांला यांच्याप्रमाणंच वचन देतें!' चित्रेनेंही जयश्रीचेंच अनुकरण केलें.

'भगिनींनो, अजून विचार करा नी माझ्या कटांत यायचं असलं तर या. मी कांहीं जुन्या चालीच्या बायकांसारखी गरीब गाय नाहीं. मी वाटेल ते जालीम उपाय काढीन. ते तुम्ही अमलांत आणले पाहिजेत. मग पाठीमागं पाऊल घेतां उपयोगी नाहीं कीं, पतींच्या करटी मोह-

जाळ्यांत सांपडतां उपयोगी नाहीं. आमच्यांत फाटाफूट झाली कीं, मग मात्र पति सुधारण्याची आशा करूं नका. कदाचित् माझे उपाय तुम्हाला चमत्कारिक वाटतील; पण ते अचुक आहेत, याबद्दल मात्र खात्री बाळगा. कुणाची पर्वा ठेवण्याचं कारण नाहीं कीं, कुणाला भ्यायची जरुरी नाहीं. एवीतेवी आमचं सौभाग्य घसरगुण्डीला लागलंयू. त्याला सावरतां सावरतां कदाचित् आपल्या हाताला यश येईल किंवा अपयशहि येईल. जें फळ मिळेल तें पदरांत घेण्याची तयारी पाहिजे. मी तिघा जणांचाही स्वभाव जाणून आहे. मूळचे तिघेही उत्तम आहेत, पण प्रसंगानं बिघडलेले आहेत. मूळचे तिघेही प्रेमळ आहेत. अजूनही—निदान वरकरणीं तरी—त्यांचं आमच्यावरचं प्रेम कमी झालं नाहीं. अजूनही ते आम्हांला भितात नी अजूनही त्यांना आपल्या अब्रूची चाड आहे; त्यामुळं आमच्या प्रयत्नांना यश येईल, असं नव्याण्णव हिश्शानं वाटतं!

'आतां पहिल्यानं काय करायचं?' जयश्रीनें विचारलें.

'आपल्या नवऱ्याशीं भाण्डायचं नाहीं; अतिशय प्रेमानं वागायचं. हें पहिलं कार्य!' सुरेखा म्हणाली.

'बरं दुसरं?' चित्रेनें विचारलें.

'त्या हॉटेलच्या पोऱ्याला आणून, त्याला कांहीं पैसे चारून त्याची जबानी घ्यायची!' सुरेखा म्हणाली.

'तिसरं?' जयश्रीनें विचारलें.

'ते जर हॉटेलांत जात असले, तर हरहुन्नर करून, तिथं गुप्तपणें जाऊन त्यांचे प्रकार डोळ्यांनीं पहायचे!' सुरेखा म्हणाली

'नी मग?' चित्रानें विचारलें.

'मग त्यावर उपाय काढायचा!' सुरेखा म्हणाली. 'मग ठरलंना आपलं?'

'हो हो, ठरलं ठरलं!' दोघींनीं अनुमोदन दिलें.

'हें अगदीं गुप्त राहूं द्या हं. चला तर आतां. वेळ बराच झाला. माझ्या मोटारींतनंच तुम्हांला तुमच्या घरीं पोंचवितें!'

श्यामसुन्दराला पुन्हां एकदा वन्दन करून तिघी जणी मोटारींत बसल्या.

## : ६ : त्या तिघी जारिणी बनणार?

गेल्या प्रकरणांतील हकीकत होऊन एक दोन दिवस लोटले होते.

दोनप्रहरचे तीन वाजले होते. कांहीं कामकाजाकरितां सर्वोत्तम बाहेर गेला होता. दिवाणखान्यांत सुरेखा आपल्याशींच कांहीं विचार करीत बसली होती. शेवटीं तिचा कांहीं नक्की विचार ठरला आणि तिनें रघूला हाक मारली, 'रघू!'

रघू येऊन तिच्यासमोर अदबीनें उभा राहिला.

'रघू, मोहनमंदिर हॉटेलच्या मॅनेजराचं नांव काय?'

'मला वाटतंया, त्या होटलला मानेजरच नाय्.'

'कृष्णराव म्हणून कोणी मॅनेजर आहेत ना?'

'किश्नराव? छेः चायकापी द्यायला पोरं हायेती, त्यामन्दी 'किशा' म्हून पोरगा बरीक हाय. पन किश्नराव म्हून कोनी न्हे!'

'बरं, त्या किशाला का होईना, एक पंधरा वीस मिनिटाकरितां बोलावून आणशील का?'

'व्हय. आनीन कीं. कुटं आनूं? इतं?'

'छेः छेः! त्या श्रीनिवासरावांच्या जयश्रीबाई आहेत ना? त्यांच्या घरीं!'

'म्हन्जे आपुन तकडं जानार व्हय्?'

'होय. मीच तिकडे जाणार. शॉफरला मोटार तयार करायला सांग!'

'जी व्हय्.' असें म्हणून रघूनें मोटार तयार करण्याची वर्दी दिली आणि तो मोहनमन्दिरात येऊन दाखल झाला. तिथें त्यानें किशाला

एकीकडे गाठलें आणि तो त्याला म्हणाला, ' तुजंच नांव किशा न्हवं काय ? '

' होय. माझंच नांव किशा. काय पाह्यजे तुला ? लवकर बोल. मला वेळ नाहीं ! '

' अर, व्हय. माहीत हाय मला, तुला येळ न्है त्यो. पर मला ह्यें सांग. या होटलमन्दीं किश्नराव म्हून कोन मानेजर हाय ? '

' अरे, मीच तो मॅनेजर. मलाच कृष्णराव म्हणतात.'

' लई ब्येस ! बराच गावलास म्हनायचा. तुला आमच्या बाई-सायबांनीं जरा बलावलया एक पन्दरा ईस मिनिटं. आपल्या मालकाची परवानगी घेऊन चल बरं माझ्या संगट !'

' कुठल्या तुझ्या बाईसाहेब ? मला मुळींच वेळ नाहीं. मोठा आलाय् लेकाचा ! '

' अरं मर्दा, असा का उड्या मारतुयास नव्या खोण्डावानी टनाटन् ? आमच्या बाईसाब का तुला फुकट बलावत्यात व्हय ? सबन्द म्हैना राबराबून, मरमरून हतं जें तुला मिळनार न्है, त्यें अर्ध्या तासांत मिळंल, याची दकल हाय का, कोमडीच्या ?'

' काय म्हणतां ? इतकं मला बक्षीस मिळेल ?'

' मग आमची धनीन मोटारींत उगीच बसतीया व्हय ? तुज्यासारख्या पोराला तसंच हात हालवीत परत पाटवील ? लई गुनाची न्, उदार बग आमची धनीन. पेरमाची माय माऊलीच म्हननास !'

' कुठें जायचंय् ?'

' चल माज्या संगट गुमानं. नेतों तुला बराब्बर !'

' मला तूं फसवून कुठेंतरी नेणार नाहींसना ? नाहींतर इकडे माझ्या नौकरीचे बारा वाजतील म्हणून म्हणतों !'

' अरं, चलर. कां उगाच शंका काडतुयास ? या रगूनं तुला ठकवलं, तर याला पायांतलं पायपोस काढून मार कीं !'

'ठीक आहे.' असें म्हणून किशानें त्रिविक्रमपन्तांपासून अर्ध्या तासाची रजा घेतली आणि तो रघूबरोबर निघाला. तेव्हां तो म्हणतो, ' किश्या,

त्येका, कपडं बदल कीं. असल त्येल्याच्या जांवायावानी घाणेरड, काळ-मिट्ट कपड घालूनश्येनी जानार व्हय त्या राजाच्या रानीसमोर?"

'याशिवाय दुसरे कपडेच नाहींत स्वच्छसे माझ्याकडे. आहेत ते याहीपेक्षां घाण आहेत!'

'बरं, चल तर त्यांचं तुज्याशीं काम हाय. तुज्या कपड्याशीं न्हे!'

वाटेनें जात असतां किशानें जिज्ञासेनें विचारलें, 'रघू, तूं मला कुणाकडे नेतो आहेस न् काय काम आहे रे तिथें?'

'ततं गेल्यावर समदं समजल, समजलास?'

किशा त्याच्याबरोबर मुकाट्यानें चालू लागला. त्याच्या मनांत नाना प्रकारचे विचार येऊन जात होते.

इकडे मोटार तयार होतांच सुरेखा भर्रदिशी जयश्रीच्या घरीं येऊन दाखल झाली. तिला पाहतांच जयश्री पळतच तिच्याकडे आली आणि हांसत म्हणाली, 'या या!'

'श्रीनिवासराव घरीं नाहींत ना?'

'छेः छेः, या वेळीं कसे घरीं असतील? ऑफिसांतून यायला साडेपांच, सहा वाजतील. चला आंत बसूं.'

'ठीक. माझी कल्पना होतीच तशी. चला.'

दोघी जणी एका छोट्याशा, पण सुन्दर रीतीनें शृंगारलेल्या खोली-मध्यें येऊन खुर्चीवर बसल्या.

'तो हॉटेलचा मॅनेजर कृष्णराव आहे ना त्याला बोलावणं पाठ-विलंय्. इथेंच घेऊन येईल रघू. त्याला जरा खुलवून, मधाचं बोट लावून, खरी बातमी काढून घेऊं. आतां येईल इतक्यांत तो.' असें म्हणून सुरेखा एकदम उठली आणि बाहेर येऊन आपल्या शॉफरला म्हणाली, 'जगदीशरावांचा आर्टस्टूडियो तुला माहीत आहेच. त्यांच्या-इथें जा न् त्यांच्या बायकोला—चित्राताईंना इकडे घेऊन ये. असशाल तश्शा या म्हणावं. एक वीस मिनिटं जरूरीचं काम आहे.'

'ठीक आहे.' म्हणून शॉफरनें मोटार स्टार्ट केली व दहा मिनि-

टांत चित्रेला श्रीनिवासाच्या घरांत आणून सोडली. तिला पाहतांच सुरेखा म्हणाली, ' या चित्राताई. कृष्णराव मॅनेजरांची—साधल्यास—जबानी घ्यायची आहे. ती सर्वांच्याच्चसमोर झालेली बरी. तुम्ही होतात म्हणायच्या घरीं. काय करताहेत फोटोग्राफर ? '

' कोणी मण्डळी आली आहेत. ग्रूप काढण्याच्या गर्दीत आहेत.'

इतक्यांत रघू किशाला घेऊन आला व त्यानें सुरेखेला तो आल्याची वर्दी दिली. तेव्हां ती म्हणाली, ' रघू, आमच्यासमोर एक खुर्ची मांड पाहूं. '

' कशाला जवळ बसवतां त्येला ? कुठला मानेज्वर त्यो ? कपत्रशा इसाळणारा पोऱ्या हाय. अंगाला घान तर वसकन् येतीया ! '

' रघू, बाबा, आपल्या कामाकरितां हें सारं सहन केलं पाहिजे बरं ! येऊं दे घाण. आण तूं आपला त्याला माझ्यासमोर.'

रघूनें त्यांच्यासमोर, पण थोडीशी लांब एक खुर्ची ठेवली व किशाला आणून तिच्यावर बसविलें.

किशा अजमासें पंधरा सोळा वर्षांचा पोऱ्या होता. जागरणांनीं आणि नाना तऱ्हेच्या व्यसनांनीं या आरम्भींच्या वयांतच त्याचीं गालफडें बसून त्याचे डोळे खोल गेले होते. अमर्याद धूम्रपानानें त्याच्या ओंठा-वर व उजव्या हाताच्या तळव्यावर व बोटावर ताम्बूस काळे डाग पडले होते. तोण्डांत विडा होताच. डागळलेल्या ओंठावर त्याचा लाल रंग कांहीं विचित्रच दिसत होता. त्याचे कपडे म्हणजे एक हाफशर्ट व एक हाफ पॅण्ट इतकेच होते. पण त्यावर तेलातुपाचीं इतकीं पुटें चढलीं होतीं कीं त्यांचा मूळचा रंग कोणता होता, हें एखाद्याला प्रतिज्ञेनेंही सांगतां आलें नसतें. त्याच्या डोक्याला कांहींच नव्हतें. बरें, केसांचेंही विंचरणें वगैरे कांहींच नसल्यामुळें ते पिंजारलेल्या चवरीसारखे दिसत होते. रघूनें सांगितल्याप्रमाणें खरोखरीच तो खुर्चीवर येऊन बसतांच त्याच्या अंगांची दुर्गंधि सुटली. पण त्याला वाईट वाटूं नये म्हणून, सुरेखेनें त्याच्या लक्ष्यांत न येईल अशा पद्धतीनें सुवासिक रुमाल नाकाशीं धरण्यास सुरवात

केली. ती मनांत म्हणाली, ‘ असल्याच्या हातचे पदार्थ खाल्ल्यावर प्रत्यक्ष आरोग्यदेवतेलाही बहात्तर रोग व्हायचे ! ’

तीन सुन्दर तरुणींच्या पुढें. येऊन आपण बसलों आहोंत, असें दिसून येतांच किशा गांगरला व त्यानें लाजेनें खालीं मान घातली. त्याला या वेळीं विडी ओढण्याचीही हुक्की आली होती, पण त्याला ती शिलगावण्याचें धैर्य होईना.

सुरेखा चित्रेकडे अंगुलिनिर्देश करून गंभीरपणें म्हणाली, ‘ या तुमच्या ओळखीच्या असतील. ’

‘ फोटोग्राफरांच्या ‘ ह्या ’ ना ? एकदा गेलों होतों यांच्या घरीं. ’

‘ तुमचं नांव काय ? काय करतां तुम्ही हॉटेलांत ? ’

‘ माझं नांव कृष्णराव. मीं मॅनेजर आहे. ’

‘ काय काय करावं लागतं तुम्हाला ? ’

‘ गिऱ्हाइकांना मागितलेला माल पुरवावयाचा. टेबल पुसायचं. कपबशा विसळायच्या. बिलं वसूल करायचीं. अशींच काहीं कामं असतात. ’

‘ किती तास काम करावं लागतं ? ’

‘ चोवीस तास. ’

‘ पगार काय देतात ? ’

‘ चाळीस रुपये. ’

‘ वाः पगार छानच आहे. एकंदरींत, कृष्णराव, भाग्यवान् दिसतां तुम्ही. ’

‘ कसले भाग्यवान् ? अहो, चाळीस रुपये म्हणजे महिना नव्हे, वर्षाला ! दोन वेळ जेवण मिळतं. दुकानांतले जिन्नसहि वाटेल तितके खावेत. पण मी खात नाहीं. कारण ते अतिशय घाणेरड्या पद्धतीनं केलेले असतात, आणि आमचं मनही विटलेलं असतं. वर्षाला चाळीस रुपये ठरलेयुत, पण आतांपर्यंत पैही हातांत पडली नाहीं. काम चुकलं, कपबशा फुटल्या, बिल घ्यायचं राह्यलं न् नासधूस झाली कीं, चाबकाचा मार मिळतो ! कण्टाळलोंय् मी या नौकरीला ! ’

‘ कृष्णराव, आम्ही लक्षाधीश आहोंत. आमच्याकडे तुम्हाला

एखादी तुमच्यायोग्य नोकरी दिली, तर तुम्ही हॉटेलची नौकरी सोडाल?'

'हो हो, खचित सोडीन!'

'मी तसा प्रयत्न करीन. पण काय हो, तुम्हाला मी कांहीं माहिती विचारली, तर ती तुम्ही मला पुरवूं शकाल?'

'माहितीचं स्वरूप कळल्याशिवाय मी तें कसं सांगूं?'

'तुमचे मालक त्रिविक्रमपन्त, त्यांच्या त्या छबूताई, ही मण्डळी कशी आहे? हॉटेलच्या बन्दिस्थ जागीं रात्रीं कोण कोण येतं? तिथें काय काय चालतं? याबद्दलची तुम्हाला जी जी माहिती असेल, ती तुम्ही आम्हांला द्याल?'

सुरेखेचे हे शब्द ऐकतांच तो घाबरला. त्याचा चेहरा पाण्ढरा फटफटीत पडला. त्या स्त्रियांनीं आपल्याला कां बोलाविलें, याचें रहस्य आतां त्याला कळलें. तो एकदम उठला आणि गडबडीनें म्हणाला, 'मी कांहीं सांगणार नाहीं!—मला कांहीं माहीत नाहीं!'

दहादहाच्या दोन व पांचाची एक, अशा एकंदर पंचवीसच्या तीन नोटा त्याच्या हातावर टेवीत सुरेखा म्हणाली, 'कृष्णराव, घाबरू नका. तुमच्या चेहऱ्यावरून तुम्हाला सर्व माहीत आहे, हें मी ताडलंय्. हें पाहा, तुम्ही जे आम्हांला सांगाल, तें या कानाचं त्या कानाला कळणार नाहीं. मालक चाबकाखालीं बडवतील किंवा नोकरीवरून काढून टाकतील, हीच तुम्हाला भीति वाटते ना? तुम्ही काळजी करूं नका आतां तुम्हाला पंचवीस रुपये दिले आहेतच, आणखीही देईन. आणि मघाशीं सांगितल्याप्रमाणं घरीं नौकरीही देईन. आम्ही इतकी मण्डळी पोसतों आहोंत, तें तुम्ही कांहीं आम्हाला जड जाणार नाहीं. बसा. सारं सांगा.'

किशाचा कागद भीतीच्या वाऱ्यानें भरकन् उडून जात होता. परन्तु जाडसं रुप्याचं वजन त्याच्यावर ठेवल्याकारणानें तो आतां स्थिर झाला होता.

किशा बसला. त्या बक्षीसाच्या रकमेनें त्याला हर्ष झाला होता. 'पंचवीस रुपये मला एकदम मिळाले अं!' तो मनांत म्हणाला, 'आणखीसुद्धां मिळतील. शिवाय चांगलीशी नोकरी. वाः धनीण

असावी, तर अशी असावी. कुणीकडे वात्सल्याची पांखर घालणारी ही आणि कुणीकडे घडोघडीं पायपोसानं पूजा करणारी छाटकी छबू!' अशा प्रकारचे विचार त्याच्या मनांत भराभर येऊन गेले. आतां त्याच्या चेहऱ्यावरील भीतीचे काळे ढग नाहींसे होत होते आणि त्याचा चेहरा शरदृतूंतील आकाशाप्रमाणें प्रसन्न दिसूं लागला होता.

'काय मी सांगितलं तें पटलं का तुम्हाला?'

'तुम्ही माझं मन बरोबर ओळखलंत. तुम्ही इतका धीर दिल्यावर मी आता कां घाबरेन? सारं सांगतों. आमच्या हॉटेलचा मालक त्रिविक्रमपन्त अगदीं उलट्या काळजाचा बघा. काय हवं तें करील, पण पैसा मिळवील. त्याची जात कोणती, तें अजून कुणाला समजलं नाहीं. कोणी म्हणतात 'ब्राह्मण,' कोणी म्हणतात कोंकणांतला 'वाणी' म्हणून. पण छबू मात्र ब्राह्मणाची हें नक्की! तिला घरचं कोणी नाहीं. शिकलीय् बरीच. मोठी झाल्यावर तिनं सरकारच्या ताब्यांत इस्टेट होती, ती घेऊन, याच्यावर खूष होऊन याला देऊन टाकलीन्. तिकडून कुठून खानदेशांतून आलंय् हें जोडपं. आमचं हॉटेल चाललंय् म्हणजे काय? या बाईच्या सौन्दर्यावर!'

'बरं,' सुरेखा म्हणाली, 'जगदीशराव वगैरे मण्डळी नेहमीं तुमच्या हॉटेलांत येतात, ती कशी येऊं लागली?'

'सांगतों ऐका.' किशा म्हणाला, 'हॉटेल घातल्यावर विक्रम पन्ताला लवकरच कळलं कीं, या गांवांत सर्वोत्तमराव नांवाचे कुणी गुलहौशी लक्षाधीश तरुण आहेत म्हणून. काय वाटेल तें करून त्यांना आपल्या जाळ्यांत ओढायचं, ही त्याची महत्वाकांक्षा! पण त्यांना हॉटेलची संवय नसल्यामुळं तें शक्य दिसेना. तेव्हां त्यानं त्यांचे मित्र कोण आहेत याचा शोध चालविला. तेव्हां श्रीनिवासराव व जगदीशराव फोटोग्राफर यांचीं नांवं त्याला समजलीं. एके दिवशीं आमचा मालक गॅलरींत उभा होता. नी ही जोडी रस्त्यानं जात होती. त्यांना पाहतांच यानं त्यांना मुद्दाम हॉटेलांत बोलावलं अन् माडीवरच्या दिवाणखान्यांत नेऊन, स्पेशल चहा, चिवडा, भजीं न् सिगारेट—कांहीं विचारूं

नका–वाटेल तितकं दिलंन्. अर्थात् आमच्या बाईसाहेब ‘ पुढं पुढं ’ करीत होत्याच. इतका सारा सत्कार झाल्यावर—फुकट हं !—आमचा मालक त्यांना काय म्हणतोय् ? आपल्यासारखे सभ्य, मान्यतेचे गृहस्थ या माझ्या मन्दिरांत येतील, तर याला कांहीं ‘ दर्जा ’ प्राप्त होईल. हें माझं खाद्यमन्दिर निवळ तेल्यातांम्बोळ्यांचं चरण्याचं ठिकाण न होतां, एज्युकेटेड जण्टिलमन लोकांचं ‘ आरामगृह ’ व्हावं, ही माझी इच्छा आहे. तर आपण वरचेवर अवश्य यावं, अन् आपले मित्र श्रीमन्त सर्वोत्तमराव यांनाही इकडे आणावं ! ‘ चहाचिवड्यानं मिन्धे झालेलेच ते.’ त्यांनीं ‘ होय ’ म्हटलं. इतक्यांत छबूताईनीं सुन्दरशा, सुवासिक पट्टया करून त्यांना मुरकत मुरकत दिल्या. तेवढ्यानंच ते हरखून हांसत निघून गेले आणि दोनतीन दिवसांच्या आंत त्यांनीं सर्वोत्तमरावांना आमच्या मालकांच्या माडीवर आणलं. पण सर्वोत्तमराव जिन्यावरून वर जातां जातां एक गम्मतच झाली; अथवा मुद्दामच केली म्हणाना ! माडीवर आमचे मालक नी छबूताई गोष्टी बोलत बसल्या होत्या. इतक्यांत या तिघांपैकीं दोघे झटकन् माडीवर गेलें अन् सर्वोत्तमराव थोडे मागें राहिले. त्या दोघांना पाहतांच व सर्वोत्तमराव खालीं आले आहेत, असं कळतांच छबूताई झटकन् उठल्या न् खालीं येण्याकरितां गडबडीनें जिना उतरूं लागल्या. लाजेनं नव्हे. कांहीं तरी त्यांना पुढची तयारी करायची होती वाटतं. कर्मधर्मसंयोगानं अशी मजा झाली कीं, त्यांची न् भाऊसाहेबांची–पुढं आम्ही सर्वोत्तमरावांना ‘ भाऊसाहेब म्हणावं ’ अशी आम्हाला ताकीद देण्यांत आली–जिन्याच्या मध्यभागींच गांठ पडली ! त्यांना पाहतांच ताईंना काय झालं कोण जाणे, त्या आपल्या ठेंचकाळून धाडदिशीं सर्वोत्तमरावांच्या अंगावर पडल्या. त्यांना त्यांनीं लागलीच सावरून धरलं. मी मागं होतोंच ! पण त्या लागलीच बाजूला झाल्या अन् ‘ आपण धरलंत म्हणून बरं झालं नाहीं तर मी गडगडत खालीं गेलें असतें. मी आपली अत्यन्त आभारी आहे !’ असं म्हणून थोडसं हांसून, ती जादुगारीण खालती चालती झाली. बिचाऱ्या भाऊसाहेबांच्यावर ही तिनं पहिली जादूची फुंकरच मारली म्हणा ना ! त्यांचं आधींच,

असं कांहीं तरी करण्याचं ठरलं होतं. मालक केव्हां तरी ' रंगां 'त आले म्हणजे सारं सांगतात. त्यांना वाटतं आम्ही या गोष्टी कुणाला सांगणार नाहीं. या पहिल्या मोहक प्रसंगानंच भाऊसाहेब भारले गेले, एवढी गोष्ट खरी! या गोष्टीला सुमारें दीड महिना झाला बघा. मग नन्तर तिघांचीही सारखी ' ये जा ' सुरू झाली. आमच्या मालकाचा हेतु साध्य झाला. आतां हे तिघे दररोज येतात. माडीवर स्पेशल खाणंपिणं होतं. त्यांच्या सरबराईला छबूताई असतात. त्यांच्या हातचा—कसलाही का घाणेरडा असेना—हे चहा गटागट आनन्दानं पितात. या बाईनं या तिघांच्याकडून—म्हणजे भाऊसाहेबांच्याकडून हिऱ्यांच्या कुड्या, श्रीनिवासरावांच्याकडून मोत्यांच्या बांगड्या न् जगदीशरावांच्याकडून दोनशेचा शालू उपटला! पुढं हळूहळू विलायती दारू सुरू झाली. अन् त्यांतनं जुगारही निघाला. रोज चाललीय् पैशाची उधळपट्टी. दारूच्या पहिल्या दिवशीं काय गम्मत झाली म्हणतां? तिघांपैकीं कुणीच घेईना. मग छबूताईनीं स्वतः हातांत ग्लास घेतले नी प्रत्येकाजवळ बसून स्वतः प्रत्येकाला पाजली!' नको ' म्हणण्याची छातीच नाहीं कुणाची! हें असंच जर चाललं, तर हे तिघे लवकरच भिकेला लागणार पाहा!' ही किशाची भयंकर हकीकत ऐकतांच तिघींचींही अन्तःकरणें थरारून गेलीं. तिघींच्याही मनांत नानातऱ्हेच्या विचारांचा एकच कल्होळ माजून राहिला. सुरेखा म्हणाली, ' काय हो कृष्णराव, तुमचा मालक पैशाकरितां काय वाटेल तें करील, असें म्हणालांत नाहीं का?'

' होय ' किशा म्हणाला ' तो इतका लोभी आहे कीं, शेणावरचा पैसा जिभेनंसुद्धां उचलून घेईल. पैसा म्हणजे त्याला परब्रह्म आहे. त्याला चोरानं गांठलं, तर जीव देईल पण पैसा देणार नाहीं! पैशाच्या पायांत त्याला आपल्या बायकोचीसुद्धां किंमत नाहीं. ती बिचारी मूळची चांगली आहे. पण याच्या नादानं फसली बघा. हे तिघे तिच्या नादाला लागले आहेत, पण ती कांहीं यांच्या हाताला अजून लागली नाहीं. सारे प्रकार दुरून दुरूनच चाललेयत! केव्हां केव्हां सबन्ध रात्रभर दारूचा न् जुगाराचा धुडगूस चालतो! आश्चर्य असं कीं, हें जोडपं

मात्र दारूच्या न् जुगाराच्या व्यसनांत सांपडत नाहीं बघा ! नुसतं ढोंग चाललेलं असतंय् !' असें म्हणून किशा थांबला. तेव्हां सुरेखा म्हणते, 'कृष्णराव, तुम्ही आम्हांला सारी माहिती पुरवलीत, याबद्दल आम्ही तुमच्या अत्यन्त आभारी आहोंत. पण ही गोष्ट कुणाला कळवूं नका हं. तसंच मीं तुम्हाला दिलेली रक्कमही कुणाला सांगूं नका. आणखी देईन, नी तुमचं कल्याण करीन, समजलांत ? जा आतां तुम्ही. आणखी बोलावलं म्हणजे या हं !'

'ठीक आहे.' असें म्हणून व तिघींना नमस्कार करून हांसत मुखानें किशा तिथून पसार झाला. मात्र जातांना पँटच्या खिशांत त्या नोटा गुपचूपपणें लपविण्यास तो विसरला नाहीं.

तो जातांच सुरेखा गम्भीरपणें म्हणाली, 'ऐकलंत सारं ? आतां तरी खात्री झाली ना ? आतां यावर तोड म्हणून आपल्याला एक महत्त्वाची भूमिका घेतली पाहिजे !'

'कोणती ?' दोघींनीं विचारलें.

'कुण्टणखान्यांतील बहकलेल्या, छिनाल जारिणींची !'

## : ७ : उभय पक्षाचें प्रेमजाल

सुरेखेचे ते भयंकर शब्द कानावर पडतांच त्या दोघी तर भीतीनें पाण्ढऱ्या फटफटीतच पडल्या. त्यांच्या तोण्डचें पाणी पळालें. त्यांच्या घशाला कोरड पडली आणि आपण या सुरेखेच्या नादीं लागून कांहींतरी भलतें सलतें करीत नाहीं ना, अशीही शंका त्यांच्या मनांत भर्रकन येऊन गेली. कांहीं क्षण स्तब्धतेंत गेल्यावर जयश्री कम्पित स्वरानें सुरेखेला म्हणाली, 'ताई, म्हणजे आम्ही जशाशीं तसं' वागावं, असं का तुमचं म्हणणं आहे?'

आतां यावर सुरेखा काय उत्तर देते, तें ऐकण्याच्या जिज्ञासेनें व आतुरतेनें चित्राही तिच्या चेहऱ्याकडे टक लावून पाहूं लागली.

सुरेखा हांसली तें तिचें हास्यही त्या दोघींना भयंकर वाटलें. तिच्या चारित्र्याबद्दलच्या संशयाची पुसट छटाही त्यांच्या मनांत उमटली. 'सुरेखा म्हणाली,' मी असं कसं बरं सांगेन? मी पुनर्विवाहाच्या विरुद्ध नाहीं; पण प्रामाणिक आहे. ज्याच्याशीं दैवयोगानं आपली गांठ पडली, त्याच्याशीं शेवटपर्यन्त प्रामाणिकपणानं, प्रेमानं नी विश्वासानं वागणं, हें मी माझं कर्तव्य समजतें. तो चुकत असेल, तर त्याची चूक त्याला दाखवून दिली पाह्यजे; त्याला ताळ्यावर आणलं पाहिजे; नी त्याकरितां वाटेल ते कडक उपायही योजले पाह्यजेत. पण हें सर्व साध्य व्हावं म्हणून स्वतःचं शील सोडलं पाहिजे असं मात्र मी म्हणणार नाहीं. एकाचा मूर्खपणा दुसऱ्याच्या मूर्खपणानं कसा जाणार? कपड्यावरचा काजळाचा डाग काळी शाई ओतून कसा नाहींसा होणार?

'मग, या भाषणाचा मघाच्या भाषणाशीं कसा मेळ घालायचा?' चित्रेनें विचारलें, 'आमची तर कांहींच कल्पना चालत नाहीं!'

'नाहींच तुमची कल्पना चालणार.' सुरेखा स्मित करीत म्हणाली,

' मी वाटेल तें साहस–धाडस सरळपणें स्वतः करीन, नी तुमच्याकडून करवीन, पण तुम्हांला आडमार्ग मात्र धरायला कधींच सांगणार नाहीं.' असें म्हणून तिनें त्या दोघींच्या कानांत हळूहळू कांहीं सांगितलें. त्यांनींही हळूहळू कांहीं शंका विचारल्या. त्यावर तिनेंही आणखी कांहीं सांगितलें. तेव्हां त्यांनीं समाधानाचा सुस्कारा सोडला. त्यावरून त्यांना तिचें म्हणणें पटलें असावें, असें वाटतें.

' झालं आतां तरी शंकेचं निरसन ? ' सुरेखेनें दोघींना विचारलें.

' हो, आतां काय, तुम्ही सांगाल, तसं आम्ही वागायला तयार आहोंत. ? जयश्रीनें निश्शंकपणें उत्तर दिलें.

' पाहा, अजून विचार करा हं. '

' छेः आतां कसला विचार करायचा ?' चित्रा म्हणाली, ' आतां विचार करूं लागलों, तर तो अविचारच होईल !'

' बरं येऊं आतां मी ?' सुरेखा जाण्याच्या तयारीनें म्हणाली.

' या. पण थाम्बा. कुंकू लावतें ' असें म्हणून जयश्री गडबडीनें स्वयम्पाकघरांत गेली. व इकडे सुरेखा व चित्रा गप्पागोष्टी करीत बसल्या. पांच मिनिटें झालीं, तरी जयश्री बाहेर येईना. तेव्हां सुरेखा उठली व स्वयम्पाकघराच्या दाराजवळ जाऊन नी आंत डोकावून म्हणाली, ' हं, हें चाललंय् का ? तरी म्हटलं कुंकू आणायला इतका का उशीर ? '

' कांहीं नाहीं आपलं उगीच ' जयश्री हांसत म्हणाली.

' बरं तर. चालू द्या. ' असें म्हणून सुरेखा चित्रेजवळ आली आणि तिला म्हणाली ' अहो, जयश्रीताई फराळाच्या न् चहाच्या गडबडींत आहेत. '

' तसं आम्हांला त्या सोडणार नाहींत, ही माझी कल्पना होतीच.' चित्रा म्हणाली.

त्या दोघींच्या आणखी कांहीं गप्पासप्पा होतात न होतात, तोंच खाद्यपेयाच्या सर्व साहित्यासह जयश्री तिथें आली आणि तिनें तें दोघींच्या पुढें असलेल्या टेबलावर ठेवलें.

खाद्यपेयांवर ताव मारतां मारतां त्यां मैत्रिणींनीं आणखी कांहीं

उरल्या सुरलेल्या इतर विषयावर चर्चा केली. याप्रमाणें फराळ आटोपतांच जयश्रीनें शॉफर व रघू यांनाही फराळासह चहा दिला आणि चान्दीचा कुंकवाचा करण्डा आणून त्या दोघींना कुंकू लावलें व आपणही लावून घेतलें आणि गम्भीरपणें ती म्हणाली, 'परमेश्वरानं दया करावी नी आमचं हें कुंकू अभंग नी निर्मळ राखावं.'

'येतों आतां आम्ही.' सुरेखा म्हणाली, 'जातांना चित्राबाईना त्यांच्या घरीं पोंचवतें न् मग मी घरीं जातें. आतां दोघींनीं 'तें' मात्र विसरायचं नाहीं अं! –कोणतं?'

'कोणतं बरं?' चित्रेनें विचारलें.

'आपल्या पतिराजांच्या बरोबर अतिशय प्रेमानं वागायचं. त्यांच्या वर्तनाचा आपल्याला संशय आला आहे, असं भासवूं द्यायचं नाहीं. रुसायचं नाहीं. फुगायचं नाहीं. रागावायचं नाहीं. अगदीं हांसायचं. खेळायचं. थट्टामस्करी करायची. गमतीजमतीनं असायचं. पण तें सुद्धां इतक्या प्रमाणांत कीं, त्याचा सुद्धां त्यांना संशय येतां उपयोगी नाहीं. नाहीं तर 'अत्यादरः शङ्कनीयः।' अशापैकीं व्हायचं!

'तुम्ही देवळांत सांगितल्यापासून मी हळूहळू तसंच चालवलंयू!'

'अन् मी सुद्धां तसंच वागूं लागलेंयू. दोन दिवस झाले.' चित्रा म्हणाली.

'ठीक.' सुरेखेनें दोघींचें अभिनन्दन केलें व ती रघूला हाक मारून म्हणाली, 'रघू, मोटार तयार आहे ना?'

'हाय ना.' रघू म्हणाला.

सुरेखेनें जयश्रीचा निरोप घेतला. चित्रेनेंही तिचें अनुकरण केलें आणि त्या दोघी मोटारींत बसल्या. जयश्री त्या दोघींना पोंचविण्याकरितां दारापर्यन्त आली. मोटारींत बसतांच सुरेखा शॉफरला म्हणाली, 'जगदीशरावांच्या स्टूडियोकडून घरीं जायचं हं.'

ड्रायव्हरनें मान हलविली. मोटार चालू झाली. पुन्हा एकदां एकमेकींनीं एकमेकींचा निरोप घेतला. मोटार दिसेनाशी झाली. जयश्री गम्भीर मनःस्थितींत घरांत गेली व आपल्या उद्योगाला लागली.

चित्रेला तिच्या घरीं पोंचवून सुरेखा आपल्या बंगल्यांत जाते न जाते तोंच सर्वोत्तम बाहेरून आला आणि तिच्याजवळ जाऊन प्रेमळ स्वरानें म्हणाला, 'हा बेहस्तानी बुलबुल कुठं भरं भरारी मारून आला?—किती नाजुक बनलंय् फूल हें? उन्हाच्या थोड्याशा धगीनंही 'इथें उषःकालची लाली चढली अं' असें म्हणून त्यानें तिच्या कपोलास नाजुकसा स्पर्श केला.

'कुठें नाहीं?' सुरेखा मुरकत, मंजुळस्वरांत, लाडिकपणानें म्हणाली 'आपल्या त्या जयश्रीताई आहेत ना, त्यांच्याकडे गेलें होतें. चित्राताईही आल्या होत्या तिथें'

'अस्सं. आम्हां तिघांची गाढ मैत्री पाहून, तुम्हीही तिघी मैत्रिणींनीं आपला संघ बनविलात वाटतं?—कांहीं हरकत नाहीं. 'संघशक्तिः कलौ युगे!'

वरीलप्रमाणें सर्वोत्तम साहजिक, सरळपणें बोलून गेला, पण सुरेखेच्या मनांत संशय उत्पन्न झाला. 'आपल्या कटाचा कांहीं सुगावा आपल्या पतीला लागला नाहींना?' हा विचार तिच्या मनांत येतांच, ती चोरून आपल्या पतीच्या मुखाकडे शोधक दृष्टीनें पाहूं लागली. पण तशा तऱ्हेची कांहीं भानगड त्यच्या मुखावर दिसून आली नाहीं. तेव्हां तिनें समाधानाचा सुस्कारा सोडला आणि पुन्हां ती त्याच्याकडे लडिवाळपणानें कटाक्ष फेंकीत व त्याच्या बटनहोलमधील फूल नीट बसवीत म्हणाली, 'आतां कपडे नाहीं का काढायचे?'

'हो. खरं विसरलोंच मी. आतांपर्यन्त 'गुलाबी कोड्यां' तच गुरफटलों होतों. तूं आठवण केलीस, म्हणून बरं झालं.' असें म्हणून त्यानें कपडे काढून ठेवले व तो एका खुर्चीवर बसला.

'बरं, आतां आपल्याला काय बरं खायला पाह्यजे?'

'तूं जवळ असलीस कीं, मला दुसरं कांहीं खावंसारखं वाटतच नाहीं!'

'म्हणजे, मला का आपण खाऊन टाकणार?'

'हो, तुला. पण तुला शाबूत ठेवून! तोंडाशीं लालडीचं नक्स-

काम केलेल्या या हांसन्या सोन्याच्या सुरईत जें अमृत भरलं आहे—जे मोहक मद्य—'

'म्हणजे ? अमृत नी मद्य एकच का ?'

'छे: 'तें' निवळ अमृतही नव्हे नी निवळ मद्यही नव्हे; अमृताची माधुरी त्यांत आहे; अमृताचा सात्विक आनन्दही त्यांत आहे आणि मद्याची निशाही पण त्यात आहे; असं हें कांहीं तरी, शृंगारसाम्राज्यांतलं अलौकिक पेय आहे. पुण्य शिल्लक असेपर्यन्तच स्वर्गात राहायला परवानगी असते, अन् स्वर्गात असेपर्यन्तच अमृत मिळतं म्हणतात. ही वस्तुस्थिति आहे कीं, केवळ कविकल्पना आहे कोण जाणें. पण याचं प्रत्यन्तर मृत्युलोकीं मात्र दिसून येतं एवढी गोष्ट खरी. कारण इथें तारुण्याचं पुण्य संग्रहीं असेपर्यन्तच स्वर्गसुख अनुभवाला येतं, अन् तोंपर्यन्तच—अधरामृताची लज्जत मिळते !—'

' म्हणजे, परमेश्वराला ' ट्रॅजिडी ' आवडते का ? '

' छे: तो तर ' सच्चिदानन्दस्वरूप ' आहे म्हणतात. '

' नाहीं, तो सच्चिदानन्दस्वरूप असता, तर त्यानं जगाला अखण्ड तारुण्यच दिलं असतं. परन्तु ज्या अर्थी त्यानं तारुण्याचा ऐन आनन्द प्राण्यापासून हिसकावून घेऊन त्याला म्हातारपणाच्या रखरखलेल्या, रूक्ष सहारा वाळवण्टात ढकललं त्या अर्थी तो ' सच्चिदानन्द ' नसावा, असं वाटतं ! ' सुरेखा म्हणाली.

' मग मनुष्याला वात्सल्याची माधुरी कशी चाखतां आली असती ? तूं म्हणतेस, तसं म्हातारपण रूक्ष न् नीरस आहे का ? अनुभवावांचून याचा निकाल कसा होणार ? कौटुम्बिक बाबतींत बाळपणांत निवळ स्वार्थाच्या आहारीं गेलेला माणूस तारुण्यांत अर्धवट स्वार्थत्याग करायला शिकतो; पण वृद्धपणीं मात्र मूर्तिमन्त त्यागच बनतो. प्रथम तामस, नन्तर राजस नी शेवटीं सात्विक आनन्दाचा उपभोग घेणारा वृद्ध माणूस ' स्वर्गातनं मृत्युलोकीं ढकललेला दुर्दैवी ' असतो, असं म्हणतां येणार नाहीं. तारुण्यांत कांहीं मजा आहे, तर वार्धक्यांतही कांहीं गम्मत आहे ! '

'पण शेवटीं मृत्यु !' सुरेखा म्हणाली, 'ही तरी मोठी 'ट्रॅजिडी' च नव्हे का ?'

'ती तरी ट्रॅजिडी असं कशावरून ठरवायचं ? मृत्यूनन्तर प्राणी ज्या अज्ञेय लोकांत जातो, तो मृत्युलोकापेक्षा वाईट आहे, असं नक्की ठरेपर्यंत मृत्यूला नांवं ठेवतां येणार नाहींत. शिवाय मृत्यूला पुन्हां 'बाल्या'कडे जाणारा राजरस्ता, असं कां म्हणूं नये ? आणि बाल्य म्हणजेच तारुण्याच्या स्वर्गाकडे जाण्याची सोपानपंक्ति !'

'कसा पण विषय अगदीं मूळपदावर आणला !' सुरेखा म्हणाली, 'बुद्धि असावी, तर अशी असावी. पाण्डित्यानं पक्व झालेल्या बुद्धींत, काव्याचा मधुर रस भरलेला असला, म्हणजे श्रोत्याला ती पंचपक्वान्नांची मेजवानीच वाटते ! दहा तासांना दहा पळं बनवायचं सामर्थ्य प्रतिभा· शाली व्यक्तींनाच असतं. अशांच्या सहवासांत मन मोठं होतं, पण दिवस लहान बनतो !'

'पण 'रसिक श्रोता' लाभणं हेंसुद्धां कवीचं मोठं भाग्यच आहे. हिरा खरा, पण त्याच्यावर किरण पडल्याशिवाय तो कसा चमकणार ? बुद्धीची चमक जाणणाऱ्या एका रसिकानंच जो कवीला आनन्द होतो, तो हजारो 'धनकनकसम्पन्न' अरसिक, लब्धप्रतिष्ठांच्या कळपानं होत नाहीं. म्हणून मी माझं काव्यगायन बाहेर करण्याच्या भरीस न पडतां, घरींच करतों, याचं कारण घरचा एकच रसिक श्रोता मला पुरे होतो. शिवाय त्याला 'आपलेपणा'ची नी 'प्रेमा'ची जोड मिळाल्यामुळं फारच बहार उडते !'

'शेवटीं माझ्या स्तुतीवर या विषयाचं पर्यवसान झालं म्हणायचं.' सुरेखा म्हणाली, 'तर मला आतां याबद्दल आपल्याला कांहीं तरीं पारि- तोषिक दिलंच पाहिजे. कारण काव्यरस कितीही उत्कृष्ट असला, तरी तो 'न पीयते ।' त्याच्या जोडीला प्रत्यक्ष कांहीं तरी लज्जतदार पदार्थ पाहिजेतच.' असें म्हणून ती उठली व तिनें चान्दीच्या नक्षीदार बशांतून बदामी हलवा, बटाट्याच्या किसाचा चिवडा व मसाल्याच्या करंज्या

त्याच्यापुढील टेबलावर आणून ठेवल्या आणि ती स्वतः चहाच्या तयारीला लागली.

चहा तयार होतांच, युरोपियन् पद्धतीच्या सर्व साहित्यासह तो ती स्वतः घेऊन आली आणि पाहते तों समोरील एकाही पदार्थास आपल्या पतीनें हात लावला नसल्याचें तिला दिसून आलें. तेव्हां ती आश्चर्यानें म्हणाली, 'अय्या! हें काय? मी म्हटलं, आपलं निम्मं शिम्मं खाऊन झालं असेल. पण आपण आपले स्वस्थच!'

'तुला सोडून मी एकटाच कसा खाऊं?'

'मी खातेंय् ना!'

'तू खात असशीलच स्वयपाकघरांत. कारण तिथलं सारं राज्य तुमचंच. पण माझ्यासमोर खा ना. दोघं एकदमच खाऊं. सहचारिणी—सहधर्मिणी ना तूं? माझ्या सुखदुःखांत तुझा अर्धा अधिक हक्क आहेच!'

'पण मी कुठें नाहीं म्हणतेंय्?'

याप्रमाणें प्रस्तावना झाल्यानन्तर त्या दोघांनीं हांसत खेळत उपहार केला. पुढें सर्वोत्तमानें दिवाणजींकडे जाऊन त्यांना कांहीं व्यवहाराच्या भानगडी सांगितल्या आणि तो पुन्हा सुरेखेकडे येऊन म्हणाला, 'सुरेखा, आतां पुढचा कार्यक्रम?'

'आपण मोटारींतून नदीवरच्या टेंकडीवर फिरायला जाऊं, गडे, आज.'

'ठीक आहे. तिकडे जाऊं.'

'शिवाय आज पूर्णिमा असल्यामुळं फारच मौज येईल तिथें.'

'जशी राणीसरकारची आज्ञा!' असें म्हणून त्यानें शॉफरला मोटार आणायला सांगितली व तें तरुण जोडपें तींतून टेंकडीच्या पायथ्याशीं येऊन दाखल झालें.

सुरेखा बुद्धीनें जशी तल्लख होती, तशीच ती शरीरानेंही चपळ होती. एखाद्या हरिणीप्रमाणें टणाटण उड्या मारीत ती टेकडीच्या मध्यभागीं येऊन पोंचली आणि तिथें बसून, मागाहून सावकाश येणाऱ्या सर्वोत्तमाला हरभऱ्याएवढा एकेक खडा मारूं लागली. तो चुकविण्याचा

प्रयत्न करूं लागला. एखादा खडा अचुक लागला कीं, दोघेंही मोठ्यानें हांसत. अशा रीतीनें तो आपल्या प्रेयसीचा मारा चुकवीत चुकवीत तिच्या जवळ येऊन पोंचला आणि हांसत म्हणाला, 'किती खडे मारायचे ग? बाकी गेल्या महायुद्धांत फ्रेंचांच्या गोळया चुकवीत जर्मनांना पुढें सरतांना काय त्रास पडला असेल, याची आतां मला कल्पना आली. तरी पण तुझ्या कटाक्षाप्रमाणेंच तूं फेकलेला खडासुद्धां मला कसा गोड लागत होता?' असें म्हणून त्यानें तिथें बसकण मारली. त्या बरोबर ती उठून म्हणते, 'हं इथेंच बसायचं नाहीं. अगदीं वर जायचं"

'वर कशाला? इथेंच बसूंया ना. वर बरीच परकी मण्डळी येतात फिरायला. त्यांना संकोच, आपल्यालाही संकोच. इथें पाहा कशी निवान्त जागा आहे ती.'

'छेः वरच जाऊं या गडे. मी हाताला धरून नेऊं का भराभर? असें म्हणून तिनें त्याला उठविलें व आपल्याबरोबर जलदीनें टेंकडीच्या माथ्यावर नेलें.

या वेळीं जलद चालण्याच्या श्रमानें सुरेखेचा चेहरा लालबुन्द झाला होता व त्यावर 'घर्मबिन्दुमाला' अवतीर्ण झाली होती. अस्ताला निघालेल्या सूर्याचे सोनेरी किरण तीवर पडल्याकारणानें तिची शोभा अनुपम दिसत होती.

घामानें डबडबलेला तिचा चेहरा पाहतांच सर्वोत्तम म्हणाला, अहाहा! काय पण चेहऱ्यावर तेजस्वी माणिक-मोती चमकताहेत.! पण यावेळीं यांना पाहण्याचा मोह आवरून धरून, या सर्वांना या रुमालांत असं पकडलं पाहिजे!' असें म्हणून त्यानें आपल्या रेशमी रुमालानें तिचा चेहरा पुसला. तेव्हां तिनेंही आपल्या जंपरच्या खिशांतून आपला हात-रुमाल काढला आणि ती म्हणाली, 'गडे, आपला चेहरासुद्धां घामानं कसा भिजून चिम्ब झालाय् टिपतें मी.' असें म्हणून तिनं तो टिपला.

'वाः, फिटास फीटच झाली म्हणायची!' एका शिलातलावर बसतां बसतां सर्वोत्तम म्हणाला. त्याच्यासमोर सुरेखाही बसली आणि

म्हणाली, ' खरंच, ही टेंकडी म्हणजे आमच्या गांवचं भूषण आहे नाहीं? किती दूरचा प्रदेश दिसतो इथून ? इथें येऊन शुद्ध हवेचं साम्राज्य हवं तितकं लुटावं ! '

' आणि टेंकडीच्या तळाशीं वाहणाऱ्या नदीचं पात्र तरी किती सुन्दर दिसतंय् ! जणु काय धार लावलेली, लखलखीत तरवारच!'

' आपल्या गांवची ही छोटी नदी, पुढें कृष्णेला मिळालीय् नाहीं? अन् दोघी मिळून समुद्राला मिळाल्या आहेत. क्यच् ! पतीला वरण्यांत काय यांचा हा एकोपा. मत्सर नाहीं, कपट नाहीं–नुसतं दिव्य प्रेम !

' असंच सर्व स्त्रिया वागतील, तर काय मौज होईल ! '

सुरेखा मनांत चमकली. छबूताई डोळ्यापुढें उभी राहिल्यामुळें तरी सर्वोत्तमानें हे उद्गार काढले नसतील ? तिनें अजीबात विषयच बदलला. ' अय्या ! सूर्य गेला अस्ताला ! नी पाहा, इकडे चन्द्रमा चमकूं लागला. जगांत दोन तेजस्वी व्यक्ति एकत्र नान्दूंच शकत नाहींत का ? सूर्य असेतों चन्द्राला कां चमकतां येऊं नये ? सूर्यास्ताचीच कां बरं त्याला वाट पाहावी लागावी ? '

' आणि दुर्बलाकडे साहजिकच सहानुभूतीचा ओघ वळतो, ही सुद्धां गोष्ट खोटी नाहीं. सूर्यापेक्षां चन्द्र कमी तेजस्वी, म्हणूनच त्याला तारकारत्नांची जोड देऊन परमेश्वरानं त्याच्या न्यूनतेची भरपाई केली. ' सर्वोत्तम म्हणाला.

' सूर्य जगाला हवा, पण जगाची प्रेमळ दृष्टि चन्द्राप्रमाणं सूर्याला कांहीं लाभत नाहीं, नाहीं ? ' अशाच प्रकारच्या काव्यमय गोष्टींत एक तास दीड तास काढल्यानंतर तीं दोघें टेंकडी उतरून खालीं आलीं आणि मोटारीनें आपल्या बंगल्यांत येऊन दाखल झालीं.

मोटारींतून उतरतांच सुरेखा चौकशीकरितां स्वयम्पाकघरांत गेली आणि सर्वोत्तम दिवाणखान्यांत आला आणि तिथें पाहतो तों त्याचे दोघे प्रियमित्र येऊन बसलेले त्याला दिसून आलें. त्याला पाहतांच श्रीनिवास हळूच म्हणाला, कां आज जोडपं फिरायला गेलं होतं वाटतं ? '

‘ काय करतां ? आमचं ‘ हॉटेल प्रकरण ’ झांकण्याकरितां हा असा जरा फाजील, प्रेमाचा शेला बायकोच्या अंगावर घालावा लागतो ! तुम्ही-सुद्धां असंच वागत चला ! ’

‘ आम्हीसुद्धां घरीं असंच प्रेमाचं फाजील नाटक रंगवतों आहोंत !’ असें म्हणून जगदीश मोठ्यानें हांसला व त्याच्या हास्यांत त्या दोघांनींही आपलें हास्य मिसळलें.

---

## : ८ : काव्यशास्त्रविनोद !

‘बायका कितीही शिकूंद्यात, सुशिक्षित होऊंद्यात, त्या खुळ्या त्या खुळ्याच !’ जगदीश हळूच म्हणाला, ‘परमेश्वरानं मूळांतच त्यांच्या स्वभावांत भोळपणा मिसळून टाकलाय्.’

‘छे: छे:, असं कसं म्हणतोस, जगदीश, तूं ?’ सर्वोत्तम हळूच म्हणाला, ‘पुरुषांत जसे भोळेभाबडे–लुच्चेलफंगे आहेत, त्याप्रमाणं स्त्रियांतही साध्या, सरळ नी वाकड्या–कुटिल व्यक्ति आहेतच. परमेश्वरानं कांहीं शहाणपणाचा किंवा अर्धवटपणाचा मक्ता एखाद्या वर्गाला दिला नाहीं !’

‘पण माझं म्हणणं जगदीशाप्रमाणंच आहे’ श्रीनिवास हळूच म्हणाला, ‘स्त्रियांत हुषार व्यक्ति असतील, पण त्या अपवादात्मक आतां आपलंच उदाहरण घेऊं. आमच्या वर्तनाबद्दल तिघांच्याही बायकांना संशय येतांच त्यांनीं त्याविरुद्ध चळवळ सुरू केली, पण आम्ही जरा खुबीनं वागूं लागतांच ती थण्ड पडली कीं नाहीं ? आतां यावरूनच पाहा कीं, कोणता वर्ग कावेबाज न् कोणता भोळा तो !’

‘पण मी म्हणतों,’ जगदीश म्हणाला, ‘स्त्रियांना संसारांतलीं सर्व सुखं मिळाल्यावरसुद्धां त्यांनीं पुरुषांविरुद्ध बण्ड कां करावं ? आम्ही बाहेर वाटेल तें करूं; आमच्या कारभारांत यांना लाण्डा कारभार करण्याचं काय कारण ?’

‘खरंच आहे हें.’ श्रीनिवास जगदीशाला पाठिम्बा देण्याच्या हेतूनें म्हणाला, ‘आम्ही यांच्यावर प्रेम करतों आहोंत; दागदागिने, उत्तम कपडे देतों आहोंत, जेवणखाणाची चंगळ उडवतों आहोंत; हांसतों आहोंत; बोलतों आहोंत; खेळतों आहोंत; सारं व्यवस्थित चाललंय्; मग कां यांनीं आमच्या बाहेरच्या भानगडींत पडावं नी अडथळे आणावेत ?’

'आणि हाच न्याय तुमच्या बायकांनीं तुम्हांला लावला तर?' सर्वोत्तम म्हणाला, 'खुळ्यांनो! जरा विचार करून तरी बोलत चला. उद्यां जर एखादी बायको आपल्या नवऱ्याला म्हणाली, 'मी बाहेर वाटेल तें करीन; वाटेल त्याच्या गळां पडेन; वाटेल तिथें जाईन; तुम्हाला माझी चौकशी करण्याचं काय कारण? तुमच्या सुखांत कांहीं कमी पडलंय् का? नाहींना? झालं तर मग. बसा गप!' तर तिचा नवरा ऐकेल का? तसंच हें. पति-पत्नी हीं दोघं म्हणजे एकमेकांच्या हक्काचं अमूल्य जडजवाहीर. तें चोरीला जाऊं लागलं, तर दुसरी व्यक्ति त्याच्या रक्षणाकरितां धडपडणारच!—या दृष्टीनं तुम्ही पाहा. अर्थात् आमच्या कल्पनेप्रमाणं सुख मिळविण्याकरितां आम्ही प्रयत्न करतों आहोंत अन् आमच्या अर्धांगी आम्ही भलतीकडे झुकूं नये, म्हणून काळजी बाळगताहेत, हें योग्यच आहे!'

इतक्यांत सुरेखा तिथें आली आणि म्हणाली, 'काय चालल्या आहेत मित्रांच्या गुजगोष्टी?'

'या वहिनी. कांहीं नाहीं. आपल्या कांहींतरी किरकोळ गप्पासप्पा.' एक खुर्ची पुढें सारीत जगदीश म्हणाला, 'सारेच दूर फिरून आलों आहोंत, दमलों आहोंत. जरा म्हटलं, विश्रान्ति घेऊन घरीं जावं. या ना बसा.'

'छेः आतां मला बसायला वेळ कुठाय् भाऊजी? जेवायला झाल्याची वर्दी सांगायला आलेंय् मी. तुम्ही सुद्धां दोघे आज स्वारीच्या पंक्तीला राह्यलं पाहिजे जेवायला.'

छेः छेः आम्हांला-निदान मला कसं राहतां येईल?' श्रीनिवास म्हणाला, 'घरांत आमची ती स्वयंपाक करून वाट पाहात बसली असेल ना. विरस होईल तिचा.'

'राहा तुम्ही आज इथें मुकाट्यानं. जयश्रीताई रागावल्या, तर मी करीन त्यांची समजूत.' सुरेखा म्हणाली.

'छेः आज नका करूं आग्रह.' जगदीश म्हणाला, 'आणखी येऊं ना केव्हां तरी.'

'बरं तर.'

दोघांनीं सर्वोत्तमाचा निरोप घेतला व ते आपआपल्या घरीं निघून गेले.

सर्वोत्तम भोजनाच्या तयारीनें आंत निघून गेला.

जेवणें झाल्यावर तिघेही नित्य नियमाप्रमाणें गुलछबूच्या क्रीडा-मन्दिरांत दाखल झाले, हें काय सांगायला पाहिजे? अर्थात् तिथें रोजचे सर्व प्रकार झालेच.

श्रीनिवास सुमारें रात्रीं साडेअकरा वाजतां परत घरीं आला. जयश्री अजून जागीच होती. ती माडीवर मंचकावर कांहीं तरी वाचत पडली होती. नुसतें पुढें केलेलें खालील दार श्रीनिवासानें पक्कें बन्द केलें व तो माडीवर आला आणि पाहतों तो काय? त्याला जयश्रीचा आजचा थाट कांहीं निराळाच दिसून आला.

आज पूर्णिमा होती. आज आकाशांत चन्द्राचें सम्पूर्ण राज्य नान्दत होतें. जणुं काय जयश्रीनें चन्द्राशीं स्पर्धा करण्याकरितां आपल्या शयनमन्दिरांत मूर्तिमन्त पूर्णिमा निर्माण केली होती. तिनें रोजचे, स्वच्छ-प्रकाशाचे, इलेक्ट्रिकचे बल्बस् काढून टाकून, त्या ठिकाणीं 'मूनलाईट'चे लावल्यामुळें चोहोंकडे शीतल व स्पष्ट चान्दणें पडल्याप्रमाणें भास होत होता. ती स्वतः रुपेरी काठाचें स्वच्छ व तलम, पाण्ढरें पातळ नेसली होती. तिच्या गौरतनुलतिकेला तें फारच खुलून दिसत होतें. कानांतील हिऱ्याच्या कुड्या व नाकांतील हिरकणी चम्‌चम् चमकत असल्यामुळें तिचें सुन्दर मुख, तारकांच्या प्रभावळींत विराजमान झालेल्या चन्द्राप्रमाणें सुशोभित झालें होतें आणि शुभ्र शय्या व उशांचे अभ्रे आणि तिचें शुभ्र पातळ, त्याच्याभोंवतीं पसरलेल्या ढगांप्रमाणें दिसत होतें. रजनीप्रमाणें दिसणाऱ्या तिच्या कृष्णकेशकलापावर खुलून दिसणाऱ्या मोगऱ्याच्या वेणीनेंही या शोभेंत भर घातली होती. तिच्या लाल ओंठाना अधिकच लाल करणारा सुवासिक ताम्बूल, मोगऱ्याचीं फुलें व प्रफुल्लित निशिगन्ध पुष्पें यांनीं आपल्या सुगन्धानें तें शयनमन्दिर दरवळून सोडलें होतें.

श्रीनिवास छबूच्या सौन्दर्यमोहिनीपाशांत सांपडला होता खरा, पण आजचा जयश्रीचा शृंगार पाहून तो दिपूनच गेला. जणुं काय ही आपली पत्नी नसून दुसरीच कोणी रूपवती तरुणी आपल्या मंचकावर येऊन बसली नाहींना अशीही त्याला क्षणमात्र शंका आल्यावांचून राहिली नाहीं; इतकें ओतप्रोत नाविन्य तिच्यामध्यें त्याला दिसून आलें. इतक्यांत त्याच्या डोळ्यासमोर छबू उभी राहिली. 'खरेंच, कोण मोहक? ती का ही? तिच्या सौंदर्यांत छचोरपणाच्या लहरी चमकत होत्या, तर हिच्या लावण्यांत भारदस्तपणा भरपूर भरला होता. मग कोणती हवी?' त्यानें मनाला विचारलेला प्रश्न बिकट होता. 'खरेंच कोणती हवी?— दोन्ही हव्यात! टाकाऊ कोणीच नाहीं?— दोन्हीही हव्यात! एक तर हक्काची होतीच. दुसरी—दुसऱ्याची होती. ती झालीच तर सर्वोत्तमाची होणार. कारण, त्याच्याकडे पैशाचा जोर! पण पैसा, स्त्रीचें प्रेम हटकून मिळवूं शकतो, असें थोडेंच आहे? सुदैवानें माझ्यावर तिचें प्रेम जडलें तर? मग कां ती लाभणार नाहीं? लाभल्यास तीही अवश्य हवीच. मनुष्य एकाच वेळीं एकाच पानांत दोन पक्वान्नें खात नाहीं, असें थोडेंच आहे?'

एका क्षणांत वरीलप्रमाणें विचार त्याच्या मनांत भर्रकन् येऊन गेले.

त्याची चाहूल लागतांच जयश्री पलंगावरून उठून त्याच्याजवळ गेली आणि स्कन्धस्पर्शपूर्वक त्याला लाडिकपणें म्हणाली 'आजचा थाटमाट कसा काय वाटला इकडे?'

'वाः फारच बहार उडालीय्! आज मला सर्व कांहीं नवीन नवीनच वाटूं लागलंय्!'

'मी सुद्धां?'

'हो, तूं सुद्धां!—तुला आठवतं का? पांच वर्षांपूर्वी एका रात्रीं, आपलीं एकान्तीं पहिली भेट झाली, त्या दिवशीं तूं जशी मला मनोहर दिसलीस तशीच आज दिसतेयुस! फरक एवढाच, त्या दिवशींच्या सौन्दर्यांत संकुचितपणा व भीति यांचं मिश्रण झालेलं होतं, तर आजच्या

मोहकतेंत खुल्या दिलाची भर पडलेली आहे!—बरं, आज हा ट्रॅन्स्फर सीन कसा काय झाला बुवा?'

'कांहीं तरी मौज करायची एवढाच उद्देश. साऱ्या जगांत मौज नी आनन्द भरलेला आहे. फक्त तो पहायला शिकलं पाहिजे. जगांतला आनन्द पाहण्याची दृष्टि ज्याला आली, त्याला दुःखाचे चटके कधींच बसायचे नाहींत. स्वर्ग दुसरा का कोणता आहे? आनन्द पाहायला शिकून त्याचा उपभोग घेणं, हाच स्वर्ग! मी कुठंसं वाचलंय् कीं, वेदसुद्धां सांगतात कीं 'जगांत आनन्द पाहा—' म्हणून. नी 'सच्चिदानन्द' म्हणजे तरी काय? ईश्वरत्त्व ना? म्हणजेच सत्य, प्रकाश नी आनन्द. पण तो बाजूला राहून वेदापुढच्या धर्मग्रन्थांनीं जगाला दुःखच पहायला शिकविलं. तीच रडकथा या घटकेंपर्यन्त चालू आहे. जग आनन्दाकरितां धडपडताहे नी शास्त्रं त्याच्यापुढें दुःख आणून ठेवताहेत. म्हणजे धड दुःखाचा अनुभव नाहीं नीं धड सुखाचाही नाहीं, अशी चमत्कारिक परिस्थिति झाली आहे जगाची!'

'जया! अग, एवढं हें अवजड तत्वज्ञान वाचलंस तरीं कुठें तूं? तूं सुन्दर आहेस हें मला कबूल, पण पण्डिता असशील, ही माझी कल्पना नव्हती! तूं शरीरानं अप्सरा बनूं लागली आहेसच, पण मनानं गार्गी—वाचक्नवीही बनूं लागली आहेस, म्हणायची!'

'नाहीं, माझं म्हणणं असं कीं, उराशीं असन्तुष्टपणा कवटाळून जन्मभर रडण्यांत काय हंशील आहे? जगांत मनुष्याची आशा ही नेहमींच 'अपूर्ण' असणार; 'पूर्ण' फक्त परमेश्वर आहे, म्हणतात. मग 'अपूर्ण' आशेच्या नादीं लागून दुःखीकष्टी असण्यांत काय तात्पर्य आहे? त्यापेक्षां आहे त्यांत गम्मत करून आयुष्य सम्पविलं, तर त्यांत नाहीं का अधिक मजा? नित्य आनन्दी असण्यानं प्रकृति निरोगी राहून, काळावर एकप्रकारचा सूड उगविल्यासारखंच होणार आहे!—माझ्या या अल्प प्रयत्नांनीं इकडच्या मनाला थोडा तरी आनन्द झाला ना? झालं तर मग. माझं श्रेय मला मिळालं!'

'छेः छेः, आज तूं पूर्णच विदुषी बनलीस! तुझं तत्त्वज्ञान कांहीं मला खोडून काढतां येईल, असं वाटत नाहीं. कारण उत्तरपक्ष करायचा, म्हणजे पूर्वपक्ष तरी कळला पाह्यजे ना? बरं असो.' तिच्यासह तो पलंगावर बसून पुढें म्हणाला, 'आज या निशिगन्धाच्या साऱ्या कुण्ड्या बऱ्या आंत आणून ठेवल्या आहेस तूं?'

'खरंच, गुलछबूचा वास किती दरवळून गेला आहे, नाहीं?'

गुल–छबूचें नांव ऐकतांच श्रीनिवास मनांत दचकला. 'आपण निशिगन्ध हा शब्द उच्चारला असतांना जयश्रीनें 'गुलछबू' हा शब्द कां वापरला? साहजिक? कीं, सहेतुक? ही तिच्या बोलण्यांतली मर्मभेदी खोंच तरी नसेलना?' त्याला कांहींच कल्पना होईना. 'तिचें नांव हिच्या कानावर गेलं असेल का? अहाहा! किती गोड नांव! गुल–छबू! –पण हें नांव इथें टाळलंच पाह्यजे!' पुढें तो मोठ्यानें म्हणाला, 'काय म्हणालीस?'

'नाहीं, म्हटलं, गुलछबूचा सुगन्ध चोहोंकडे किती पसरून राह्यलाय्!'

'हो, जशी 'नाइट क्वीन' ही 'रात्रीची राणी' तसंच याला, 'नाईट किंग,' 'रात्रीचा राजा' ही पदवी द्यायला हरकत नाहीं. फक्त रात्रीच याच्या सुवासाची खरी बहार असते; म्हणूनच याला 'निशि–गन्ध' म्हणतात. पण 'निशिगन्ध' हें काव्यमय, गोड नांव सोडून, 'गुलछबू' 'गुलछबू' काय म्हणतेस? मला हीं असलीं परकीं नांव मुळींच आवडत नाहींत!'

'बायका–पोरांच्यासुद्धां तोंडांत येणारं नांव परकं का? विद्वानांनीं परकीं नांवं काढून टाकण्याचं मनांत आणलं, तर जगांतली कोणतीही भाषा अर्धीअधिकसुद्धां शिल्लक उरणार नाहीं. परकी शब्दांची लूटमार करूनच प्रत्येक भाषा फुगलेली आहे!'

'पण आपला शब्द असतांना परका शब्द काय म्हणून वापरायचा?'

'पण परक्या शब्दांवर बहिष्कार घालायचा, हा तरी न्याय

कोणता ? केव्हां तो वापरावा, केव्हां तो वापरावा. मी आत्तांपर्यंत निशिगन्ध हा शब्द वापरीत होतेंच कीं, नाहीं ? आतां साहजिक हा वापरला. आतां इकडे त्या शब्दाचा तिटकाराच असला, तर तो शब्द नाहीं वापरणार बापडी. विनाकारण हटवादानं मन तरी दुखविण्यांत काय तात्पर्य आहे ?"

'तसं नाहीं ग, आपला गमतीचा वादविवाद. बरं, हीं झाडं आंत बरी आणून ठेवलीस.'

'सारा सुवास येथेंच दरवळून रहावा म्हणून !—पाहा तरी फुलांचें झुबकेच्या झुबके लागून राह्यले आहेत ?' असें म्हणून ती त्याला घेऊन एका निशिगन्धाच्या झाडापाशीं गेली, आणि त्याच्याकडे पहात म्हणाली 'हीं सारीं झाडं आपण दोघांनीं मिळून लावलीं नाहीं ?'

'हो, दोघांनीं मिळून कुण्ड्यांतून माती घातली अन् दोघांनीं मिळून या झाडाची लागण करून, त्यांना पाणी घातलं !' तो म्हणाला.

'आतांचा यांचा बहार पाहून आपल्याला किती आनन्द होतोय् नाहीं ?'

'हो, केलेल्या श्रमांचं चीज झालं. आपणां दोघांच्या प्रयत्नाचीं सुवासिक 'फळं' आतां आपल्या घराला सुशोभित करताहेत' कां कोण जाणे, श्रीनिवासाच्या मुखांतून वरील वाक्यें निघतात न निघतात तोंच दोघांच्याही चेहऱ्यावर विषण्णतेची गाढ छाया पडली आणि दोघेंही कांहीं क्षण स्तब्ध झालीं.

काय बरें याचें कारण असावें ? तरुण पतिपत्नींचें प्रेमसम्मीलन झाल्यानन्तर कांहीं दिवसांनीं तें सुखही अपुरें वाटून, त्यांच्या मनांत एक प्रकारची अस्वस्थता उत्पन्न होते व 'आपल्यास एखादें गोण्डस, गोजिरवाणें 'गृहरत्न' लाभलें तर बरें,' असें त्यांना वाटूं लागतें. अपत्यप्राप्तीशिवाय संसारांतील आनन्द पूर्ण होत नाहीं. हा नेहमींचाच अनुभव आहे. 'पतिपत्नींचा शृंगार' हें एक 'सुवर्णमन्दिर' अशी कल्पना केली, तर 'वात्सल्याचा अमृतानुभव' हा त्याचा 'रत्नमय कळस' म्हणतां येईल. त्या दोघांना हा लाभ अजून झाला नव्हता. शेजारीं

पाजारीं त्यांच्याच वारगीच्या जोडप्यांना एकेक, दोनदोन अपत्यांची प्राप्ति झाली होती. पण अद्याप आपल्या दैवीं कां हें सुख नाहीं ? हेंच शल्य त्यांच्या हृदयाला बोंचत होतें आणि यामुळेंच तीं दोघें क्षणमात्र खिन्न झालीं.

परन्तु प्राप्त परिस्थितींत आनन्द मानून राहायचें, असें तूर्त तरी जयश्रीनें ठरविल्यामुळें तिनें आपल्या खिन्नतेला तावडतोब हद्दपार केलें आणि ती हांसत म्हणाली, ‘ या फुलांचा वास सुद्धां किती मधुर आहे नाहीं ? नाहीं तर एकेक फुलं आपल्या सुवासाच्या भपकाऱ्यानं डोकं उठवितात अगदीं ! याच्या सुवासांत एक प्रकारची मादकता आहे ?

‘ अन् रंगसुद्धां किती मोहक ! जणुं काय हीं फुलं दुधाचींच बनविलीं आहेत. परमेश्वरानं तरी वस्तादगिरीच लढविली आहे. त्यानं ज्या फुलांना सुवास दिलाय् त्यांना रंग अगदीं साधेसुधे दिलेत, अन् ज्या फुलांकडे सुवासाची देणगी नाहीं, त्यांच्याकडे मारे भडक रंगांची लयलूट उडविलीय् !’

‘ साऱ्या जगांत फुलांचीं रसिक अशीं दोघंच; एक परमेश्वर आणि दुसऱ्या स्त्रिया. फुलांचा उपभोग घ्यावा या दोघांनींच. पुरुष फुलांचे शोकी असतात, नाहीं असें नाहीं, पण किती ? फ्लावरपॉटमध्यें एखादा पुष्पगुच्छ ठेवतील किंवा कोटाच्या कॉलरींत एखादं फूल अडकवितील; पण देवाला हजारांनीं, लाखांनीं फुलं वाहावीं लागतात नी बायका तर काय ! तीन्ही त्रिकाळ फुलांना ‘ शिरसा मान्य ’ करून आपल्या डोक्यावर बसवितात !–मग तीं फुलं सुवासिक असोत कीं, नुसतीं भडक रंगीबेरंगी असोत !’

‘ वाः, म्हणजे काय तूं फुलांच्या बाबतींत पुरुषांना अरसिक समजतेस, वाटतं ? पुरुष केव्हांही ‘ सारग्राही ’ असतात. ते फारशीं फुलं वापरीत नसले, तरी त्यांचीं अत्तरं वापरतातच कीं, नाहीं ? पाटीभर फुलांचा भारा डोक्यावर वाहण्यापेक्षां त्या सर्वांचं सत्त्व–अत्तराचे दहा थेम्ब–हातरुमालावर वापरणं, हें अधिक चांगलं नाहीं का ?’

‘ सोन्यासारखीं नाजुक, सुन्दर फुलं चुरडून त्यांचं सत्त्व पिळून घेणारे पुरुष निर्दयच म्हटले पाहिजेत ! एखाद्या गोड, बालकाचं चुम्बन

त्याला न दुखवितां हळूच घेणं बरं कीं, आपलं श्रियाळ—चांगुणे-प्रमाणं—-पुरुष अशी फुलांची दुर्दशा करतात !'

'अन् स्त्रिया काय कोमल हृदयाच्या असतात वाटतं ? फुलांच्या बाबतींत स्त्रिया म्हणजे शुद्ध, क्रूर कसाई असतात !'

'हा नवीनच शोध दिसतोय् !'

'नवीन नाहीं, अगदीं सनातन आहे ! बिचारीं फुलं लतेच्या कडेवर मोठ्या आनन्दानं बसलेलीं असतात. पण तें स्त्रियांना पाहवतंय् कुठें ? लागलीच त्या त्यांना निर्दयपणें हिसकावून घेतात आणि त्यांच्या हृदयांत सुई खुपसून, त्यांना गतप्राण करून त्यांचीं शवं डोक्यावर वाह-तात. असल्या क्रूर कर्माला रसिकता म्हणायची असल्यास म्हण बापडी ! तुझं तोण्ड कोण धरणार ?'

'वा:, भली दांडगी बडबड करून मुद्दा कसा अगदीं माझ्या गळ्यांत बरोबर अडकविला कीं !'

'हें बघ, बडबडीचं मोजमापच केलं तर तें आमच्यापेक्षां तुमचं चौपट सहज भरेल ! पण थोडं नी मुद्देसूद बोलावं आम्हीं पुरुषांनींच ! तुमची भाषा म्हणजे नुसतीं फोलकटं ! सत्त्व मुळींच नाहीं. तुम्ही तुमच्या जिभेला, तोण्डाला न् आमच्या कानांना विनाकारण श्रम मात्र देतां झालं !'

'बायकांची बडबड फक्त कानांनाच त्रास देते, पण पुरुषांची बडबड जगाची उलथापालथ करते ! जगत्संहार करणारीं महायुद्धं पुरुषां-च्या बडबडीनंच निर्माण झालीं आहेत. असले अनर्थ तरी नाहींना आमची बडबड करीत ?'

'छे : बुवा बिनतोड मुद्दा काढलास अगदीं ! तोण्डाला कुलूपच घातलंस माझ्या ! '

'आमची बडबड पुष्कळ असली, तरी तो नुसता पोंकळ, भेण्डाचा भारा, त्यांत सामर्थ्य तें काय असणार ? पण पुरुषांची भाषा थोडी असली, तरी ती बारा बारी पिस्तूल ! हां हां म्हणतां बारा जणांचे प्राण घेईल !

'छे छे : आतां तर आम्ही या मुद्यानं अगदीं चीतच झालों !

‘ शिवाय स्त्रियांच्या फाजील बडबडीला पुरुषच कारण आहेत ! ’

‘ तें कसं काय ? ’

‘ पुरुष वाटेल ती कृति करायला समर्थ आहेत. बायकांना कुठें तसं स्वातन्त्र्य आहे ? त्या बिचाऱ्यांनीं नुसती बडबड करावी नी स्वस्थ बसावं. स्त्रियांच्या बाबतींत पुरुषांनीं कितीही अन्याय केले, तरी त्यावरची बिनतोड मात्रा त्यांच्या जवळ कुठाय् ? बिचाऱ्या घसा फुटेपर्यंत नुसती बडबड करतात नी स्वस्थ बसतात ! बायका अधिक बोलक्या कां असतात, याचा उगम आतां समजला का ? ’

श्रीनिवासाचा चेहरा उतरला. त्याला वाटलें गुलछबूला उद्देशून ही असें लागून बोलत नसेलना ?

जयश्री पुढें म्हणाली, ‘ हें मी सर्वसामान्य बोलतेंय् हो. माझ्या स्वतः पुरतं पाह्यलं, तर माझ्यासारखी भाग्यशाली मीच ! ’ असें म्हणून तिनें आपलें कोमल बाहुपाश त्याच्या कण्ठांत टाकले. तेव्हां त्याची वृत्ति पुन्हां प्रफुल्लित झाली आणि तो म्हणाला, ‘ आतां झोंपायचं नाहीं का ? रात्र बरीच झाली ! ’

याप्रमाणें गमतीच्या गोष्टी झाल्यानन्तर, एकमेकांवर प्रेमाचे पाश टाकण्याचे डाव खेळणारें तें जोडपें, एकमेकांना बाहुपाशांनीं गुरफटून निद्रादेवीच्या स्वाधीन झालें.

---

# : ९ : राजा कधीं गुन्हा करतो का?

आज पूर्णिमा असल्यामुळें बाहेर स्वच्छ पिठासारखें चान्दणें पडलें होतें. घड्याळांत रात्रीच्या अकराचे ठोके नुकतेच पडले होते. घरांत चित्रा एकटीच असून ती अजून जागीच होती, जगदीश कुठें गेला आहे, हें तिला पक्कें माहीत असल्यामुळें ती अस्वस्थ चित्तानें उगीचच इलेक्ट्रिकचे स्विच दाबीत वेड्यासारखी घरांतून हिण्डत होती नन्तर तिनें एक कादम्बरी वाचण्याकरितां काढली. परंतु तिची दहा पानें वाचलीं, तरी त्यांतल्या अर्थांचें तिला आकलनच होईना, म्हणून तिनें ती फेकून दिली. नन्तर ती विणण्याचें सामान काढून कांहीं तरी विणूं लागली, परन्तु तिच्या बोटांत सारखी सुई घुसूं लागल्यामुळें तिनं तेंही सर्व साहित्य टाकून दिलें. पुढें ग्रामोफोन काढला, पण आज प्रो. व्यास, हिराबाई वगैरे सर्व गायकवर्ग बेसूर गात आहे असा तिला भास होऊं लागला. त्यामुळें तोही बन्द करून तिनें हार्मोनियम उघडला, पण आज त्याच्यावरून तिचीं बोटेंच चालेनात. एकन्दरींत आज तिचें कशावरच चित्त लागेना.

आज तिचें मन अधिक अस्वस्थ होण्याचें कारण म्हणजे आज आपला पति छबूच्या घरीं सबन्ध रात्रभर राहातो कीं काय याची तिला भीति वाटत होती. समोरच एक जगदीशाचा फोटो टांगला होता. तिकडे ती गेली आणि डोळ्यांत पाणी आणून त्याला म्हणाली, ‘आपल्याला असं दुसऱ्याच्या घरीं रात्रभर राहाणं बरं वाटतं का हो ? तुमच्याकरितां, एक तुमचं माणूस कासावीस होऊन नी डोळ्यांत प्राण आणून तुमची वाट पाहात बसलंय्, याची आठवण नाहीं कां तुम्हांला असत ? तुम्ही किती कोवळ्या हृदयाचे होतां हो, अन् आतांच असे कसे कठोर झालांत?

तिनें आपले डोळे पदरानें पुसले आणि ती आपल्याशींच हांसून

म्हणाली, ' मी वेडी तरी नाहींना ? त्यांच्या फोटोला काय मी सांगतेंय् हें ? '

इतक्यांत घड्याळांत साडेअकराचा ठोका पडला.

चित्रेच्या पोटांत धस्स झालें. यावेळीं घड्याळांतील एकेक ठोका म्हणजे हृदयावर बसलेल्या कुऱ्हाडीच्या एकेक घावाप्रमाणें तिला वाटत होता. एकदां सन्तापून तिनें घड्याळाकडे पाहिलें. पण तें बिचारें एखाद्या इमानी नौकराप्रमाणें आपलें काम आटोपून, निर्विकारपणें ' टिक् टिक् ' आवाज करीत चालत होतें.

पण इतक्यांत कोणी तरी पुढील दरवाजा उघडल्याचा तिला भास झाला. ती धांवतच दरवाजाकडे गेली, आणि पाहते तों काय, जगदीशाची मूर्ति हातांत सायकल घेऊन दारांत उभी! तिचा आनन्द गगनांत मावेना. आज पूर्णिमा. स्वारी घरीं आली म्हणायची ! तिनें चटकन् दरवाजा बंद केला आणि त्याच्या हाताला धरून हांसतच ती त्याला शयनगृहांत घेऊन आली.

आपली पत्नी रोषांत नसून खुषींत आहे, याबद्दल त्याला समाधान वाटलें. तरी पण त्याचें मन त्याला खात होतें. चित्रेच्या मोहक हास्याचें प्रतिबिंब त्याच्याही चेहऱ्यावर पडलें होतें खरें. पण तें निर्भेळ नव्हतें. त्यांत निरनिराळ्या विकारांच्या छटा मिसळलेल्या होत्या.

अंगांतील कपडे काढतां काढतां कांहीं तरी बोलायचें म्हणून जगदीश म्हणाला, ' अजून तूं जागीच ? '

' अजून म्हणजे ? सारे साडे अकरा झालेत. कांहीं वेळ चान्दण्याची मौज पाह्यली; थोडी कादम्बरी वाचली; नवे रेकॉर्ड लावले; असा ग्रामोफोन ठेवला, इतक्यांत स्वारी आली ! माझी कल्पनाच होती, आत्तां येणं होईल म्हणून !'

' तें कशावरून ? परवांसारखा स्नेह्याच्या घरीं अडकलों असतों म्हणजे ? '

' शक्यच नाहीं. आज पूर्णिमा. दुसरीकडे राहणं होईल का कधीं ? '

बिछान्यावर बसून व तिचा हात आपल्या हातांत घेऊन तो म्हणाला, ' पूर्णिमेला घरींच राहीन, अशी शपथ का घेतलीय् मी ? '

‘ प्रत्यक्ष शपथच कशाला घ्यायला पाहिजे ? हे संकेत न सांगतांच एकमेकांनीं जाणून पाळायचे असतात !–ती पहा,–’ ती त्याला खिडकीकडे घेऊन गेली व आकाशाकडे बोट दाखवून म्हणाली, “ बऱ्याच दिवसांनीं पूर्ण स्वरूपांत प्रगट झालेल्या प्रियकरावर, लखलखीत पारिजात पुष्पें फेकून रजनी स्वागत करीत आहे ! पृथ्वीतलावर पडलेलं हें चान्दणं नसून, दोघा प्रेमळ दम्पतीच्या निर्मल हास्याचं प्रतिबिम्ब आहे !–अशा आनन्दोत्साहाच्यावेळीं आमच्यासारख्या तरुण नी प्रेमळ जोडप्यानं एका गांवांत असूनही निरनिराळया ठिकाणीं असणं बरं दिसलं असतं का ? या मौजा वर्षांतून थोड्याच वेळां अनुभवायला सापडतात नी त्यांतल्याही एक दोन चुकविल्या, तर. . . ’

‘ चित्रा, आतां तूं चारच वाक्यं बोललीस, पण किती सुन्दर काव्य निर्माण केलंस ? मी काव्याचा फारसा भोक्ता नाहीं; वास्तविक आमच्यासारख्या आर्टिस्टाचं अन्तःकरण काव्यमयच असायला पाहिजे; पण या तुझ्या सुन्दर कल्पनांनीं मला एक प्रकारचा अवर्णनीय आनन्द झाला, एवढी गोष्ट खरी ! मला वाटतं, मला काव्यं आवडत नाहींत, ही माझी समजुत चुकीची झाली असावी ! बोल बोल बरं, आणखी असंच कांहीं तरी मधुर बोल ! ’

‘ आतां काय बरं बोलूं ? साठविलेली शिधोरी सम्पली ! किनाई, आपण यायच्या आधीं मी ‘ प्रसन्न पूर्णिमा ’ कादम्बरी वाचीत होतें. सहज आढळलेलीं त्यांतलीं वाक्यं पाठ करून ठेवलीं होतीं मी. तशी जर मी खरी कवयित्री असतें तर आत्तापर्यन्त—’

‘ का असेना– ’ तिच्यासह एका कोंचावर बसत तो म्हणाला, ‘ मधमाशाप्रमाणं मधुसंचय करणं हें सुद्धां कांहीं वाईट नाहीं. अन् कवि तरी काय करतात ? सृष्टींतलं सौन्दर्य तेवढं वेचतात अन् त्याला प्रतिभेच्या जोरावर कल्पनांची जिल्हई देतात !—बरं, आज मी साडे अकरापर्यन्त आलों नाहीं, तेव्हां तूं अगदीं काळजींत पडली असशील ! ’

‘ छट् ! मला कांहींच वाटलं नाहीं. पुरुषांच्या मागं व्याप थोडे का असतात ? बायकांना काय घरांत बसून कल्पना होणार ? त्यांना वाटतं

नेहमीं आपला पति-आपल्या जवळ असावा. पण पुरुषांना नेहमीं घरांत बसून कसं भागेल बरं?—'

'काय करतेस? हा स्टूडियो काढण्यापेक्षां कुठें गव्हर्मेण्टमध्यें नौकरी धरली असती, तर बरं झालं असतं, असं वाटूं लागलंय्! थोडा का असेना, पण महिन्याकाठीं नेमका छन् छन् पगार नौकराच्या हातांत पडतो आणि फिगर फिक्स असल्यामुळं तेवढ्या रकमेंत त्याला आपलं मन्थली बजेट बनवितां येतं. आम्हाला पैसे बरे मिळतात; आमच्यावर कोणी वरिष्ट ऑफीसर नाहीं; ऑफीसटाईम सांभाळायला नको; या साऱ्या गोष्टी खऱ्या; पण बिलं वसूल करतांना किती त्रास होतोय् तो माझा मला माहीत; अन् रक्कम किती जमा होईल, याचा अंदाज नसल्यामुळं कोणत्याही गोष्टी आगाऊ ठरवितां येत नाहींत!'

'मग बिलं वसूल करायला एक स्पेशल माणूस तरी ठेवावा.'

'माणूस ठेवून कांहीं उपयोग होणार नाहीं. तुला आश्चर्य वाटेल; गोरगरीबांचीं बिलं मुळींच थकत नाहींत; नव्हे, पैसे आगाऊ रोख हातांत येतात. बिचारे पैसे खिशांत टाकल्याखेरीज स्टूडियोंत येतच नाहींत. उधार काम करून घेण्याची त्यांना खरोखरीच लाज वाटते. त्यांच्याजवळ 'अब्रू' हें एकच धन असल्यामुळं ते तिला फारच जपत असतात. खरंच, गरीबांची अब्रूही नाहींशी झाली, तर त्यांच्याजवळ काय शिल्लक उरणार?—पण बडे बापके बेटे, घमण्डानन्दन, गर्विष्ठ नी मिजासखोर श्रीमन्त शेटसावकार, वकील, डॉक्टर, ऑफीसर रावसाहेब यांची गोष्टच वेगळी आहे. हे स्टूडियोंत ऐटीनं येतील. हे आले कीं, इतर सर्व जरूरीचीं कामं बाजूला ठेवून आधीं यांच्यापुढं हात जोडून उभं राह्यलं पाह्यजे. आणि पदराला खार लावून यांच्या 'चहा-चिवडा-चिरूटा' ची व्यवस्था केली पाह्यजे. मग यांच्या लहरीप्रमाणं स्टूडियोंत किंवा यांच्या घरांत, हे म्हणतील तितके नी म्हणतील त्या आकाराचे फोटो काढून दिले पाह्यजेत. सर्वांचीं कामं एकीकडे सारून यांचीं कामं आधीं दिलीं पाह्यजेत. कारण यांची तशी ताकीदच असते. जरा उशीर झाला कीं, यांचा शिपाई मागं लागतो. हे श्रीमन्त असल्यामुळं यांच्याकडे

ॲडव्हान्स मागायची सोय नसते. चुकून मागितला, तर यांचा घुस्सा होतो. बरं, हे श्रीमन्त असल्यामुळं यांच्याकडून बिल तरी चांगचं दण-दणीत मिळेल म्हणावं, तर तिकडूनही निराशा. कित्येकाकडून जेमतेम रीतीप्रमाणं येतं, कित्येक निम्यावर भागवितात; तर कित्येक अजीबातच बुडवितात! संपत्तीचा जोर असल्यामुळं बेअब्रू झाली, तरी त्याची त्यांना पर्वा नसते. चित्रा, संपत्तीनं श्रीमन्त, पण अन्तःकरणानं दरिद्री असलेल्या असल्या अहंमन्यांना यापुढं स्टूडियोंत पाऊलही ठेवूं देऊं नये; फक्त प्रामाणिक, गरीब लोकांचंच काम–दोन पैसे कमी मिळाले तरी–घ्यावं असं मला वाटूं लागलंय्. आतां तूंच सांग; गरीबांचे पैसे आगाऊच वसूल होतात; आणि श्रीमंतांच्याकडे माणूस पाठविला कीं, त्यांचा अपमान होतो न् शिव्यांची लाखोली मिळते; अशा परिस्थितींत स्पेशल माणसाचा काय उपयोग?—शिवाय ऑफीसर लोकांचा त्रास होतो, तो कांहीं औरच! परवां चीफ पोलीस ऑफीसरनं आपल्या फॅमिलीचे फुलसाईज फोटो काढविले, अन् त्याच्या एकूणीस प्रतींची ऑर्डर दिली. पण तो बिचारा प्रामाणिक होता. त्यानं मला संशयांत न ठेवतां स्वच्छ सांगितलंन् 'मिस्टर जगदीशराव, या कामाचं बिल मिळेल, अशी तुम्ही आशा करूं नका. हें सर्व तुम्ही आम्हांला मोफत करून द्यायला पाह्यजे. अन् तें तात्रडतोब पाह्यजे. यांतल्या कांहीं प्रती आमच्या नातेवाईकांच्याकडे रजिस्टर करून पोस्टानें पाठवायच्या आहेत. तुमच्याकडून जसं हें काम व्यवस्थेशीर होईल, तसं दुसऱ्याकडून होणार नाहीं. तेव्हां तुम्हाला मी पत्ते देतों. तुम्ही पोस्टलस्टॅम्पस् लावून रवाना करण्याची व्यवस्था करा!' 'गण्डस्योपरि पिटकः संवृत्तः।' मी आधीं त्याच्या फोटोच्याच कामानं जर्जर झालों होतों, त्यांत आणि हा पोस्टेजचा भूर्दण्ड पडतोय् असं पाहतांच तर माझ्या तोण्डचं पाणीच पळालं. मी मोठं धैर्य धरून म्हणालों, 'रावसाहेब, फोटो कसे तरी काढून देतों, पण ही दुसरी ब्याद माझ्या मागं लावूं नका! कारण मला फुरसतच नाहीं!' त्या दयाळु ऑफीसराला माझी दया आली वाटतं. कारण तो म्हणाला, 'बरं तर. फोटो तरी जलदी काढून द्या. पाठविण्याची व्यवस्था त्या गोपीचन्द गुजरा

कडून करूं. ' अशा रीतीनं तें दुसरं संकट शेवटीं माझ्या डोक्यावरून उडून गोपीचन्दाच्या डोक्यावर बसलं. गरीबांच्या अज्ञानाचा वाटेल तसा फायदा घेऊन त्यांच्याकडून भरपूर पैसा उपटायचा आणि या 'अरेरावां ' ची भर करायची, असा रोज प्रकार चाललाय् आमचा. बरं, हे ऑफीसर कधीं काळीं उपयोगी पडतील म्हणावं, तर त्याचं नांवच नको. यांचं कितीही काम करा, यांच्यावर कितीही उपकार करा, शेवटीं हे आपल्या जातीवर जाऊन एखाद्या वेळीं आमच्याच हातापायांत बेड्या अडकावयला कमी करणार नाहींत! यांची खोड कशी मोडावी, या विचारांत मी आहें; पण डोकंच चालेना!—'

' ऑफिसरांचं एक राहूं द्या, पण इतर ' बाजीरावाचे बेटे ' पैसे बुडवितात, त्यावर काय तोड काढणं झालंय्?'

' तूंच सुचव ना एखादी!'

' मला वाटतं, जे लोक पैसे बुडवतील, त्यांचे फोटो ' पैसे बुडविणारे थोर लोक ' अशा हेडिंगचा एक मोठा बोर्ड करावा न् त्यावर ते लावावेत. नी रस्त्यावर ठेवावेत! मात्र त्याच्याआधीं त्या त्या लोकांना सूचना द्याव्यात. ' आठ दिवसांच्या आंत पैसे आणून द्याल, तर बरं आहे; नाहीं तर तुमचा फोटो बुडव्यांच्या यादींत जाहीर करूं!'

' उपाय अचूक नी जालीम आहे खरा, पण कायद्याच्या दृष्टीनं तो तितकासा बिनधोक नाहीं. कारण दिवाणी कोर्टाचा रस्ता खुला असतांना एखाद्याची अब्रू अशी चव्हाटयावर टांगायला आम्हांला अधिकार नाहीं. शिवाय त्या लोकांनीं पैसे बुडविलेले किंवा बुडविण्याची त्यांची इच्छा होती, हें सिद्ध झालं पाहिजेना? त्यापेक्षां हें ' विकतचं श्राद्ध घेऊन सव्यापसव्य ' करण्याऐवजीं त्यांच्या ऑर्डर्स यापुढं अजीबात घेतल्याच नाहींत म्हणजे झालं!—आतां हें बघ—' असें म्हणून त्यानें आपल्या कोटाच्या खिशांतून नोटा काढून आणल्या व त्या तिच्या हातांत देत तो म्हणाला, ' हे पन्नास रुपये वसूल करतां करतां माझ्या नाकीं नऊ आले. बच्या दहा लोकांकडचे हे पैसे आहेत. केव्हां जा, घरांत भेटतच नाहींत. तेव्हां म्हटलं, आज रात्रींच सर्वांना स्वतःच गांठावं. बारा वाजले तरी

हरकत नाहीं. मग अकरा, सव्वा अकरापर्यन्त फिरलों. काय मिळाले. तेवढे पैसे कोम्बले खिशांत न् कण्टाळा आला तेव्हां आलों घरांत!–हे ठेव तुझ्याजवळ!–'

'माझ्याजवळ?'

'अग, तूं गृहलक्ष्मी ना? लक्ष्मीकडे लक्ष्मी गेलेली बरी. विष्णु जरी लक्ष्मीपति असला, तरी त्याच्या हातांत शेवटीं शंखच! मीही तसंच वागायचं ठरविलंय्. बिलं वसूल करतांना सायकलचा हॉर्न तेवढा माझ्या हातांत पण पैसे तुझ्यापाशीं!'

'हें आज काय नवीनच धोरण दिसतंय्! आतांपर्यन्त कधीं माझ्याजवळ पैसे दिले नव्हते, म्हणून म्हणतेंय्!'

'घरांतलं राज्य पत्नीचं ना? मग घरीं आलेल्या सम्पत्तीवर माझा काय हक्क आहे? राणी सरकारच्या ट्रेझरींतच ही जमा होणं योग्य आहे.'

'पुरे मेली थट्टा!'

'हें बघ, आजपासून मीं असं ठरविलंय् कीं, जो पैसा येईल, तो तुझ्याजवळ ठेवायला द्यायचा. अन् जो खर्च होईल, तो तुझ्या सम्मत्तीनं करायचा. पुष्कळ ठिकाणीं या धोरणानंच पतिपत्नी चालतात. अशानं पतीला पैसे मिळविण्याच्या कर्तबगारीचा डौल–मुकेपणानंच—पत्नीपाशी मिरवितां येतो, अन् तिलाही एक मोठा बहुमान मिळाल्याचा भास होऊन आनन्द होतो. अशा रीतीनं दोघंही खूष होण्याचा हा एक सोपासा उपाय आहे!—आतां खरं म्हणशील, तर याचं कारण निराळंच आहे—'

'कोणतं तें?—'

'निःपक्षपात दृष्टीनं जर पाहिलं, तर पुरुषांचंच मन अधीर नी चंचल असतं. 'स्त्रिया चंचल असतात' ही नुसती पुरुषांनीं उठविलेली भूमका आहे. स्त्रियासारखा सोशीक, मनाला आवरणाऱ्या न् खोल बुद्धीच्या स्त्रियाच. त्यांची सर पुरुषांना येणार नाहीं. आपण गरिबींतून एकेक पावलानं का होईना–वैभवाकडे येत आहोंत; थोडासा पैसा हातांत

खेळतोय्; अशा वेळीं मन चंचल होण्याचा संभव आहे. तेव्हां आपला पैसा तुझ्या हातांत असलेला बरा. तुझ्याच अनुमतीनं त्याचा व्यय झाला म्हणजे भीति नाहीं!'

'इकडे विनाकारण ही भीति वाटतेय्. आपलं मन भलतीसलती कडे झुकणंच शक्य नाहीं. व्यसनी होणं, तर सुतराम् अशक्य. तीं माणसं निराळींच असतात अन् त्यांचीं लक्षणंही पण निराळींच दिसतात. माझं लग्न झाल्यापास्नं बघतेय् स्वारीला; अगदीं शुद्ध गंगाजल. तें शेवट-पर्यंत पवित्रच राह्यचं. म्हणून म्हणतें, हे पैसे आपल्याजवळच ठेवावेत.'

'छे: छे: चित्रा, पुरुषांवर तूं फाजील विश्वास ठेवूं नकोस पुरुषांचं अन्तःकरण पुरुषांना जेवढं ओळखतां येईल, तेवढं बायकांना खचित ओळ-खतां येणार नाहीं. जन्मभर शुचिर्भूत राहून म्हातारपणीं व्यसनी बनलेल्या पुरुषांचीं शेंकडो उदाहरणं मी तुला दाखवून देईन. मी आत्तांपर्यंत कोणत्याही वाईट छन्दांत नाहीं ही गोष्ट खरी, पण यापुढं मी मद्यप्राशन करणारच नाहीं, किंवा एखाद्या बाजारबसवीच्या गळ्यांत हात टाकणारच नाहीं, असं तूं समजूं नकोस!'

'हें शक्य तरी आहे का?'

'यांत काय अशक्य आहे? नदीकांठचे कावळे नदींतलं पाणी न पितां जवळच सांचलेल्या घाणेऱ्या डबक्यांतलं पितात, हें तूं नेहमींच घाटावर पाहतेस ना? घरीं पत्नीनं प्रेमानं स्वच्छपणें केलेले पदार्थ न खातां, हॉटेलांत जाऊन त्या गलिच्छ पदार्थांवर ताव मारणारे लोक जगांत कमी नाहींत.'

'त्यांत त्यांचा दोष नाहीं. त्याला तसंच आर्थिक कारण असतं!'

'तें कोणतं प्रोफेसरीणबाई?'

'घरीं पदार्थ करवले, तर सर्व मुलाबाळांना द्यायला पाहिजेत. अर्थात खर्च अधिक येणार. पण हॉटेलांत गेलं, तर वाटेल ते पदार्थ खायला मिळून—'

'आपल्या कच्च्याबच्च्यांना अन् पत्नीला सोडून एकटंच हॉटे-लांत गिळणाऱ्या पुरुषांना मी नरपशु समजतों! श्रीखण्डपुरी असो की,

मीठभाकरी असो, कर्त्या पुरुषानं सर्व मुलाबाळांसह एकत्र खाणं, यांतच त्याला भूषण आहेन् यांतच सांसारिक आनन्दाचा परमावधि आहे!'

'पण माझ्याजवळ ठेवलेले पैसे नीट राहतीलच याचा काय नियम? आम्हा बायकांना तेव्हांच मोह पडतो. चांगलसं लुगडं–पातळ पाह्यलं किंवा चांगलंसं एखादं नवीन घाटाचं भाण्डं बघितलं कीं, तें लागलीच आम्हांला घ्यावसं वाटतं. अन् आमच्या मनात तें भरलंय्, अशी दुकानदाराची खात्री झाली कीं, त्यानं दीडपट किम्मत लावलीच. असले जिन्नस खरेदी करतांकरतां माझ्याजवळची रक्कम सम्पली तर?'

'कुछ परवा नाहीं! तुझ्या जवळचे पैसे खर्च झाले, तर ते घरच्या संसारोपयोगी वस्तु खरेदी करण्यांत होतील. व्यसनांत तरी होणार नाहीत!'

'मला वाटतं, माझ्याकडून कांहीं अपराध झालाय्, म्हणून ही मला शिक्षा करणं झालंय्!'

'भलतंच काय बोलतेस, चित्रा? उलट मलाच वाटूं लागलय् कीं माझ्याकडूनच कांहीं गुन्हा घडलाय्, म्हणून तूं ही रक्कम स्वीकारीत नाहींस!'

'छेः छेः असं काय बरं म्हणायचं तें? आपण माझे राजे; राजा कधीं गुन्हा करतो का? ठेवतें बरं मी माझ्याजवल पैसे.' असें म्हणून तिनें त्या नोटा बॅगमधें ठेवून दिल्या व ती परत त्याच्याजवळ येऊन बसली. इतक्यांत घड्याळांत बाराचे ठोके पडले. तेव्हां ती म्हणाली, 'अग-बाई! बारा वाजले!'

'चला तर आपण आतां झोंपूं!'

याप्रमाणें गोष्टी झाल्यानन्तर एकमेकांच्या डोळ्यांत डावपेचाची धूळ फेंकणारें तें तरुण जोडपें, सर्व विकार विसरून लवकरच निद्रादेवीला शरण गेलें!

---

# : १० : रा. सा. भीमराव.

रावसाहेब भीमराव सबइन्स्पेक्टरांच्या दिवाणखान्यांतील घड्याळांत दोनप्रहरच्या तिनीचे ठोके पडतात न पडतात तोंच त्यांच्या बंगल्यासमोर एक मोटार येऊन उभी राहिली आणि तीमधून तीन तरुणी उतरल्या.

दरवाजांत त्यांची वाट पाहत एक शिपाई उभा होताच. आगाऊ ठरल्याप्रमाणें त्यानें त्या तिघींना एका विवक्षित दालनामध्यें नेऊन बसविलें व तो रावसाहेबांना वर्दी देण्याकरितां गेला.

सुमारें दहा पांच मिनिटांतच एक, पेन्शनीच्या हद्दीवर येऊन पोंचलेले, रुबाबदार, पाण्ढरें शुभ्र धोतर नेसलेले व अंगांत रेशमी शर्ट पेहरलेले असे गृहस्थ तिथें आले. हेच ते रा. सा. भीमराव फौजदार.

दुसऱ्यावर जरब बसविण्याजोगी त्यांची ती किंचित् भयानक मुद्रा पाहतांच तिघींनाही दरदरून घाम सुटला. त्यांतली एक तर अतिशयच भेदरून गेली.

त्यांना पाहतांच तिघीही उठल्या. तेव्हां रावसाहेब म्हणतात, 'उठायचं कांहीं कारण नाहीं. बसा तुम्ही.'

रावसाहेबांच्या साध्या शब्दांतही असा कांहीं जोर होता कीं, त्या तिघींनीं एखाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें खुर्चीमध्यें एकदम बसकण घेतली.

'आमची चिठी आपल्याला सकाळीं पोंचली असेल.' त्यांपैकीं एक जरा धीर धरून म्हणाली.

'हो, माझंही उत्तर तुम्हाला लागलीच पोचलं असेल'

'हो, आमच्या विनन्तीला मान देऊन आपण—'

'छट्! विनन्ति विनन्ति कसली! माझी ड्यूटीच आहे ही!

वास्तविक हें माझं ऑफिसचं टाईम. पण मी मुद्दाम तुमच्या मुलाखती-करितां आज घरीं राह्यलों. बोला तुम्हांला काय बोलायचं असेल, तें खुल्या दिलानं बोला. यावेळीं तुमच्यासमोर एखादा पोलीस–ऑफिसर नसून तुमचा पिता बसलाय्, असं समजा अन् मोकळ्या अन्तःकरणानं सारं सांगा !'

रावसाहेबांच्या या एका वाक्यानेंच त्या तिघींना धीर आला. रावसाहेब दिसतात क्रूर, बोलतात खणखणीत, पण अन्तःकरणानें मृदु आणि सभ्य आहेत, एवढें त्यांना समजून येतांच त्यांची भीति पुष्कळशी कमी झाली आणि त्यांच्या चेहऱ्यावर प्रफुल्लता विलसूं लागली.

'तुम्हा बायकांचा स्वभाव बडबड्या असतो.—' थोडासा ताशेरा झाडण्याच्या उद्देशानें रावसाहेब म्हणाले, 'रागावूं नका. स्पष्ट सांगतों. तुम्ही एकच गोष्ट दहादां सांगाल, दहा प्रकारांनीं सांगाल, पण मला तें खप-णार नाहीं अन् इतकं चऱ्हाट ऐकून घ्यायला मला वेळही नाहीं. तेव्हां तुम्हांला काय सांगायचं असेल तें थोडक्यांत सांगा—मुद्देसूद सांगा—मह-त्त्वाचं असेल तेवढंच सांगा !–'सुरेखा' नांवाच्या बाईनीं मला चिठ्ठी पाठविली होती. यांतल्या सुरेखाबाई कोण ?'

'मी !' सुरेखेनें स्वतःची ओळख करून दिली.

'मग या दुसऱ्या दोघी कशाला आल्या आहेत ?'

'त्यांचंही आपल्याकडे काम आहे.'

'तीघींचीं कामं निरनिराळीं आहेत ?'

'तीघींचं मिळून एकच काम आहे !'

यानन्तर सुरेखेनें स्वतःची, जयश्रीची व चित्रेची ओळख करून दिली व सर्वांची माहितीही सांगितली. तेव्हां रावसाहेब किंचित् गाम्भी-र्यानें म्हणतात, एकन्दरींत तुम्ही तिघीजणीं तिघा सभ्य गृहस्थांच्या गृहिणी आहांत म्हणायच्या ! तुमचे पति माझ्या चांगल्या परिचयाचे आहेत. एक फोटोग्राफर, एक सरकारी नौकर न् एक बडा सावकार ! मग तुमचे मालक माझ्याकडे न येतां तुम्ही बऱ्या माझ्याकडे आलांत ?'

'तसंच महत्त्वाचं काम आहे आपल्याकडे !'

‘ स्त्रियांनीं गुप्तपणें माझी भेट घ्यावी, इतकं पोलीसखातं सोज्वळ आहे, अशी तुमची कल्पना आहे ?—विचार करा !—’

‘ हो, तशी कल्पना आहे ! ’ सुरेखा म्हणाली.

‘ चूक आहे तुमची ! हिंदुस्थानांतलं पोलीसखातं इतकं सोज्वळ न् संभावित नाहीं. आतां कॉंग्रेसच्या राज्यांत झाल्यास न कळे ! पोलीसांत अशिक्षित लोकांची भरती झाल्यामुळं, तें खातं माणुसकीला पारखं झालंय् अन् कांहीं ऑफिसर लोकांनीं तर दारू, वेश्या न् लांच यांनीं त्यांवर अगदीं कळसच चढविलाय् ! हिंदुस्थानांतल्या पोलीसखात्याइतकं बदफैली न् लोकांना अप्रिय असं खातं जगांतल्या कोणत्याही राष्ट्राचं नसेल ! म्हणून म्हणतों, तुमच्यासारख्या सभ्य, कुलीन, तरुण न् सुस्वरूप स्त्रियांनीं माझ्यासारख्या इसमाला एकान्ती भेट घेण्याबद्दल चिठ्ठी लिहिणं म्हणजे–’

‘ स्त्रिया या बडबड्या असतात,—’ सुरेखा हळूच, पण भीतभीत मधेंच म्हणाली, ‘ असं म्हणणाऱ्यांनींच इतका लांबलचक, अप्रस्तुत विषय काढावा—’

‘ हां, मधेंच बोलूं नका ! मधेंच बोललेलं आमच्या खात्याला खपत नाहीं!–मी म्हणतों, माझी एकान्तीं भेट घेण्यांत तुम्हाला धोका वाटला नाहीं? ’

‘ नाहीं ! ’

‘ तो कसा ? ’

‘ आपण म्हणतां, तसं कदाचित पोलीसखातं असेल, पण त्यांतले सारेच इसम कांहीं तसे असणार नाहींत, हें नक्की ! त्यतून आपल्या-संबंधानं लोकांत जो आदर, भावना न् श्रद्धा आहे, त्यावरून आपली गुप्त भेट घ्यायला कांहीं हरकत नाहीं, असा आमच्या मनांत विश्वास उत्पन्न झाला अन् म्हणूनच आम्ही आपली भेट निश्शंकपणानं घेण्याचं ठरविलं. आपण सज्जन आहांत याचा पुरावा, आम्ही आपल्या दिवाण-खान्यांत पाऊल टाकतों न टाकतों तोंच आमच्या हातांत आला !—’

‘ बाः सुरेखाबाई ! तुम्ही जन्मजात वकील दिसतां कीं !—पुरावा ? माझ्या चांगुलपणाचा कोणता पुरावा तुमच्या हातांत आला ?—सांगा, सांगा ! ’

'आम्ही इथं येतांच आपण आमचे वडील बनलांत नी आम्हांला आपल्या मुली बनविलंत, त्यावरून !'

'शाबास ! शाबास ! हुषार आहांत ! चतुर आहांत ! संसाराचा गाडा फारच सुन्दर रीतीनं हाकीत असाल !—पण काय हो,—रागावूं नका. आमच्या सूक्ष्म पोलिसी दृष्टीला जें दिसतंय्, त्यावरून विचारतों हं—तुमचा पोषाख व्यवस्थित, नीटनेटका न् थोडासा फॅन्सीही दिसतोंय्; अंगावर दागदागिनेही निवडक, पण मोहक दिसताहेत; अन् केशभूषाही चालू काळाला योग्य अशीच दिसतेय्; तुमचे पतीही समाजांत चांगले सभ्य न् आनन्दी म्हणून गणले जातात; या साऱ्या गोष्टी असल्या तरी तुमचा चेहरा कांहीं तसा प्रफुल्लित दिसत नाहीं; उलट सुकल्यासारखा दिसतोय् ! कोणत्या तरी काळजीच्या धगीनं—'

'हो, आपली कल्पना बरोबर आहे.' सुरेखेचे डोळे ओले झाले. ते हातरुमालानें टिपत ती पुढें म्हणाली, 'आमचे म्लान झालेले चेहरे पुन्हां टवटवीत व्हावेत नी आमचं जन्माचं कल्याण व्हावं, म्हणूनच आम्ही तिघी आपल्या चरणाजवळ आलों आहोंत !'

आपला अजमास बरोबर ठरला हें पाहून रावसाहेबांच्या चेहऱ्यावर थोड्याशा समाधानाच्या छटा पसरल्या. पुढें ते म्हणाले, 'छेः छेः ! 'आपल्या चरणाजवळ आलों' असल्या तऱ्हेची भाषा बिलकूल वापरूं नका ! वास्तविक आम्ही तुमचे नोकर आहोंत. तुमचीं सारीं संकटं दूर करणं, हें आमचं कर्तव्यच आहे !—सांगा, कोणत्या काळजींत तुम्ही आहांत अन् तुम्हाला माझी कोणती मदत पाहिजे ?'

'आम्हा तिघींचेही पति हॉटेलांत जातात !—'

'बस्स ! एवढंच ? मग हें कांहीं फारसं मनावर घेण्याजोगं, मोठं भयंकर व्यसन नाहीं !—हॉटेलांत जात नाहीं कोण ? घरांत पंचपक्वान्नं असलीं, तरी एकदा तरी हॉटेलांत जाऊन मजा मारण्याची लहर येतेच ! विलायतेंत 'हॉटेल' ही अत्यन्त उपयुक्त अशी सामाजिक बाब समजली जाते. हॉटेलं हीं समाजाला अवश्य पाहिजेत. ज्यांना घरदार, बायको-

बिन्हाड नाहीं, अशा भिळवत्या फटिंगांनीं, हॉटेलं नसलीं तर कुठं खावं न् काय खावं ?—आतां तुमच्या पतींसारख्या सांसारिक न् घरीं वाटेल त्या खाद्य पदार्थांची अनुकूलता असणाऱ्या गृहस्थांनीं मात्र हॉटेलांची पायरी चढावी, हें थोडं गर्ह्य आहे !'

'नुसते हॉटेलांत गेले असते, तर आम्ही आपल्याकडे तक्रार कधींच केली नसती. पण तिथं जाऊन दारू प्यायची म्हणजे काय ? आठवण झाली कीं, अंगावर शहारून कांटा येतो !'

'काय दारू ?' आश्चर्यानें रावसाहेब म्हणाले; 'तर मग नवीनच दिसतंय् हें व्यसन ! या शहरांतल्या बहुतेक दारूबाजांची यादी माझ्याजवळ आहे. ठेवावी लागते ती आम्हांला. पण तिच्यांत नाहींत तुमच्या पतिराजांचीं नांव. आतां घातलीं पाहिजेत ! प्रत्यक्ष नायकांनीं साक्ष दिल्यानन्तर ही गोष्ट खोटी कशी असेल ? पुढं—'

'मित मद्यपान सुद्धां कदाचित् आम्हाला मान्य झालं असतं. त्यानं अशी कितीशी नुकसानी होणार ? पण त्याच्या जोडीला जुगार सुरू झाल्यावर कोट्याधिशाचा करटीवाला व्हायला उशीर लागेल का ?'

'काय ! त्याच्या जोडीला जुगारही ? आतां मात्र तुमचे यजमान कायद्याच्या कचाटींत आले ! कारण कॉंग्रेसराज्यांत कांहीं जिल्ह्यांतून जरी पूर्ण दारूबन्दी झालेली असली, तरी 'दारू पिणं' हा कांहीं अजून सार्वत्रिक गुन्हा ठरलेला नाहीं. पण जुगाराचं तसं नाहीं. हं, मग ?'

'पण त्या जुगाराबद्दलही आम्हांला तितकंसं वाटत नाहीं. फार झालं तर आम्ही त्यामुळं गरीब होऊं इतकंच. पण आम्हा नवराबायकोचं अखण्ड, निर्मळ नी निर्व्याज प्रेम असेल, तर तशा गरीबींतही आम्हांला स्वर्ग निर्माण करतां येईल. पण तेवढंही सुख आम्हांला लाभणार नाहींसं दिसूं लागलंय् !—'

'तें कसं काय ?'

'त्याच हॉटेलांत एक मनमोहक अशी जादुगारीण असते ! हॉटे-

लची मालकीणच म्हणाना. ती आम्हा तिघींचेही संसार उध्वस्त करायला बसलीय्, नी हेंच सर्वांत मोठं असं संकट आम्ही समजतों!'

' म्हणजे तुम्हीं ' मोहनमन्दिर ' हॉटेलासम्बन्धानं सांगतां काय?'

' होय, तेंच तेंच ! ' जयश्री मधेंच गडबडीनें म्हणाली.

' हं ! या हॉटेलासम्बन्धानं कांहीं गुप्त रिपोर्ट माझ्याकडे गेल्या आठदहा दिवसांत आलेयुत. मी त्यांतल्या भानगडींचा पूर्ण छडा लावण्याच्या विचारांत होतोंच. अशा वेळीं तुम्ही त्याच्यासम्बन्धानं कागाळ्या घेऊन माझ्याकडे आलांत, हें चांगलं झालं! बरं, तुम्ही आतां एकदा या प्रकरणाचा साग्र इतिहास मला सांगा बरं. म्हणजे मला पुढं पाऊल टाकायला बरं पडेल ! '

नन्तर आपल्या पतिराजांचा आपल्याला कसा संशय आला, आपल्या मैत्रिणींनाही कसा आला, मग आपला संघ कसा स्थापन झाला, पतींच्या व्यसनांचे पुरावे कसे हस्तगत झाले, किशानें आपल्या जबानीनें या सर्व प्रकरणावर कसा स्वच्छ प्रकाश पाडला, पुढें आपण कसें धोरण ठरविलें वगैरे गेल्या दीड दोन महिन्यांतली हकीकत सुरेखेनें त्यांना सविस्तरपणें सांगितली. ती ऐकतांच ते खूष होऊन म्हणाले, ' तुम्ही स्त्रिया खरोखर मुत्सद्दी होण्याच्या लायकीच्या आहांत! मग या सम्बन्धांत माझी मदत तुम्हाला कोणत्या प्रकारानं पाह्यजे?'

आपण आपल्या अधिकाराचा उपयोग करून जबरदस्तीनं त्यांचं व्यसन बन्द पाडलं पाह्यजे!' सुरेखा करारीपणानें म्हणाली.

' मला वाटतं एकदम आपला पोलिसी दण्डुका दाखविण्यापेक्षां नाजुक तऱ्हेनं त्यांचीं मनं वळविलीं तर?'

' तीं कशीं?' चित्रेनें भीत भीत विचारलें.

' तुम्ही साऱ्या मोहक तरुणी आहांत. तुम्ही लाडिकपणानं, गोडव्यानं न् नाजुक तऱ्हेनं आपल्या पतींना हीं व्यसनं सोडण्याबद्दल विनवणी केलीत, तर मला नाहीं वाटत ते तुमच्या इच्छेला लाथाडून पलीकडे जातीलसं!— '

'ते आमच्या कक्षेच्या केव्हांच बाहेर गेले आहेत! आतां ते आमच्या हाताला लागणं शक्य नाहीं!' सुरेखा म्हणाली, 'आतां आम्हांला एक निराळीच भीति वाटूं लागलीय्!'

'कोणती?'

'त्या गुलछबूनं—छबूताई तिचं नांव—त्या गुलछबूनं तिघावरही मोहनी घाललीय्; अर्थात् तिघांच्या मनांत एकमेकाबद्दल मत्सर उत्पन्न होणार. याचं पर्यवसान मारामारींत नी खुनांत झालं नाहीं, म्हणजे मिळविली!'

'सम्भवनीय आहे, तसंसुद्धां सम्भवनीय आहे! आतां आलं माझ्या लक्षांत. प्रसंगीं मी माझं रौद्रस्वरूप दाखवूनही त्यांना ताळ्यावर आणावं, असं तुमचं मत! शहाणा शब्दानं सुधारतो; मूर्खाला दण्डुकाच पाहिजे! पण अशानं तुमच्या पतींची गांवांत बेअब्रू होईल! एकदां प्रकरण पोलीसांच्या कचाट्यांत सांपडलं अन् एकदां या वर्तमानपत्रांनीं मनावर घेतलं कीं, मग गांवांतच काय, पण जगभर तुमच्या पतिराजांच्या दुष्कृत्यांचे डांगोरे पिटले जातील, याची वाट काय?'

'अन् तेवढ्याकरितां. तर आम्ही आपली खाजगी भेट घेतली! नाहीं तर आम्ही आपल्याकडे रीतसर अर्ज दिला असता. आम्हांला त्यांच्यासम्बन्धानं कोर्ट, खटले, साक्षीपुरावा होऊन या भानगडी चव्हाट्यावर यायला नकोयुत. अशानं त्यांचीं मनं कायमचीं विथरलीं जातील, त्यांची अब्रू खलास होईल नी कदाचित् त्यांना सजाही होईल! पण या साऱ्या गोष्टी न होतां आपण आपल्या वजनानं नी अधिकारानं त्यांना ताळ्यावर आणलं पाहिजे!'

'हो, तसं आणतां येईल. व्यक्तीला ताळ्यावर आणणं हाच कायद्याचा प्रधानहेतु आहे! तेवढ्याकरितां कजेखोकले करायला पाहिजेतच असं नाहीं. त्यावांचूनच जर या गोष्टी साध्य झाल्या, तर काय याची कांहीं तशी हरकत नाहीं. मी त्यांना खुबीखुबीनं ताळ्यावर आणीन. पण यामुळं तुमच्याबद्दल मनांत दंश धरून त्यांनीं तुमचा जन्मभर छळ केला तर?'

'तसं कधींच होणार नाहीं! कारण तिघेहि मूळचे चांगलेच आहेत. नी तिघांचंही आमच्यावर निस्सीम प्रेम आहे. अजूनसुद्धां ते आमच्याशीं उत्तमच वागतात. व्यसनांच्या मगरमिठींतून सोडविल्या बद्दल उलट ते आमचे उपकारच मानतील! हें त्यांच्या कानांत तात्पुरतं वारं शिरलंय् म्हणानांत. नवीन आहे, तोंपर्यंत सुधारण्याची आशा आहे. एकदा मुळं पक्कीं झालीं कीं, मग ब्रह्मदेवाच्या बापालाही ते ऐकणार नाहींत! आपला रुद्रावतार प्रगट झाल्यावर ते फार झालं तर चार आठ दिवस आमच्यावर रुसतील, फुगतील, भाण्डतील, पण नन्तर सरळमार्गा-वर येतील! पण पुढच्या भयानं आज का प्रयत्न सोडून द्यायचाय्? पुढं काय होईल तें होईल. निदान आपण आपलं कर्तव्य पार पाडलं, एवढं तरी मनाला समाधान वाटेल. आम्ही नव्या जमान्यांतल्या 'नव्या पति-व्रता' आहोंत. पति सुधारणं हें आमचं ध्येय आहे, नी तें आम्ही वाटेल त्या योग्य, अयोग्य उपायांनीं साधूं. 'अमकं चांगलं नी अमकं वाईट!' बघत बसणार नाहीं!'

'छान, फारच छान! तुम्ही बिलकूल काळजी करूं नका! तुम्हांला सर्व प्रकारें मी मदत करीन अन् तुमचे संसार अभंग राखीन बरं! आतां या योजना कशा घडवून आणायच्या, त्याचा मी दोन दिवस विचार करतों अन् तुमच्याच अनुमतीनं काय तें नक्की ठरवितों. तोंपर्यंत तुम्ही काय कराल?—'

'आम्ही त्या त्रिविक्रमपन्ताची गांठ घेऊन, त्याला कांहीं तरी चाटा देऊन त्याच्या हॉटेलांत गुप्तपणें प्रवेश करतों नी 'चक्षुर्वै सत्यम्' या म्हणीला अनुसरून आम्ही सर्व प्रकार एकदा डोळयांनीं पाहतों. कारण आत्तांपर्यन्त आम्ही या साऱ्या गोष्टी नुसत्या कानानं ऐकल्या आहेत. नन्तर काय करायचं तें—!

'ठीक ठीक. मीही माझे डिटेक्टीव्ह तोंपर्यन्त त्यांच्यावर सोडून देतों. एकन्दरींत त्या त्रिविक्रमपन्तानं हॉटेलच्या नांवाखालीं या शह-रांत बरंच बण्ड माजवलंय् म्हणायचं! खराच 'त्रिविक्रम' दिसतोय्! दारू, वेश्या न् जुगार या तीन पावलांनीं त्रिभुवन व्यापण्याचा त्यानं

व्यापार आरम्भलाय्! अशी खोड मोडतों त्याची कीं, पाहतच रहा!'

'हे आपले आमच्यावर उपकार आहेत! आतां आम्ही आपली रजा घेतों. बरं यापुढं-आपली भेट?—'

'तुम्ही सांगाल तेव्हां!'

'आम्ही आपल्याला आगाऊ चिठी पाठवूं. नमस्ते!' सुरेखेनें त्यांना नमस्कार केला. जयश्री आणि चित्रा यांनींही तिचें अनुकरण केलें आणि त्या त्यांचा निरोप घेऊन मोटारींतून निघून गेल्या.

---

## : ११ : मत्सरपिशाच!

रावसाहेब भीमराव यांच्या बंगल्यापासून सुरेखेची मोटार निघाली ती श्रीनिवासाच्या घरासमोर येऊन उभी राहिली. आणि तींतून तिघी उतरल्या. जयश्रीनें घराचें कुलूप काढलें आणि तिघी वरच्या माडीवर येऊन दाखल झाल्या.

बैठकीवर बसतांच एक समाधानाचा सुस्कारा सोडून सुरेखा म्हणाली, 'एक तर मोठं काम पदरांत पडलं म्हणायचं ! कारण तो भीमराव सज्जन असला, तरी थोडासा तिरसट नी चमत्कारिक माणूस आहे. तो आमच्याशीं सरळ बोलतो कीं नाहीं, याचीच मला शंका होती !'

'पहिल्यानं तो थोडासा आपल्या स्वभावावर गेला होताच !' जयश्री म्हणाली, 'पण नन्तर हळू हळू ताळ्यावर आला ! सुरेखाबाई, तुम्हीच म्हणून त्याच्याशीं धीटपणानं बोलूं शकला. माझी कांहीं छाती झाली नसती !'

'नी मी तर घामानं नुसती निथळलेंच होतें !' चित्रा म्हणाली, 'अजून कांहीं छातींतली धडकी कमी झाली नाहीं ! आपण कुठं आहोंत नी कुणीकडे जात आहोंत, हेंच कळेना ! सुकाणू नी शीड नसलेल्या होडीप्रमाणं माझ्या मनाची अवस्था झाली होती !'

'छेः, छेः ! चित्राताई, तुमचं मन कमकुवत म्हणून तुम्हाला तसं वाटलं. आमचा रस्ता चुकला नाहीं. आपण सरळच जात आहोंत. यांहून चमत्कारिक प्रसंग यायूचेयूत ते पुढंच आहेत ! घाबरूं नका. धीर धरा. नी माझ्यावर विश्वास ठेवून माझ्यामागून चला' असें म्हणून सुरेखेनें तिच्या पाठीवरून हात फिरविला आणि ती पुढें म्हणाली, 'पतींवर असलेल्या आमच्या निर्मल प्रेमाची तपश्चर्या खरी असली, तर या साहसांत आम्हांला यश मिळालंच पाहिजे !'

सुरेखेच्या या धीरगंभीर शब्दांनीं चित्रेला बरं वाटलें. तिनें एकवार तिच्या दृष्टीला दृष्टि भिडविली आणि ती खुदकन् हांसली. जणुं काय तिनें तिच्यावरील आपला विश्वास आपल्या स्मितहास्यानें प्रगट केला.

' आतां पुढं ? ' जयश्रीनें विचारलें, ' स्वारी कचेरींतनं यायच्या आंत काय तें इथं ठरविलं पाह्यजे ! '

' आतां उद्यां दोन प्रहरीं तीन वाजतां त्रिविक्रमपन्ताची भेट घ्यायची नी आंत प्रवेश होतो का नी त्या तीघांच्या लीला पाहायला मिळ-तात का, याचा प्रयत्न करायचा ! ' सुरेखा म्हणाली.

' आतां मात्र कठिण ग बाई ! त्या हॉटेलांत शिरायचं म्हणजे दरवडेखोरांच्या गुहेंत किंवा दारूच्या गुत्त्यांत शिरल्याप्रमाणंच वाटणार आम्हांला ! ' हांसत हांसत जयश्री म्हणाली, ' पण त्या हॉटेलांत आमचा प्रवेश कसा व्हायचा ? नी झाला तर गुप्तपणें झाला पाह्यजे. दोन प्रहरची तीन वाजायची वेळ म्हणजे इतकी ढळढळीत कीं, वाहणारा अदृश्य वारासुद्धां डोळ्यांना दिसूं लागायचा, मग आमची काय कथा ? मग कसं करणार ? '

' किशाच्या माहितीवरून हॉटेलला मागचं दार असून, तें कांहीं फारशा रहदारीच्या रस्त्यावर नाहीं. एका गल्लींत आहे न् त्यावरून तुरळक तुरळक ' ये जा ' असते. आमची मोटार घेऊन गेलों, तर लोक ओळखतील. म्हणून आपण तुमच्या घरांतून टॅक्सी घेऊन निघूं नी हॉटेलांत शिरतांना तोण्डावर बुरखे घेऊन आंत शिरूं. आमची भाषा होईपर्यन्त टॅक्सीवाला राहील नी पुन्हां आम्हांला तुमच्या घरांत आणून पोचवील. किशा सांगत होता. हॉटेलांत वरच्या बाजूला कांहीं स्पेशल खोल्या आहेत. त्यापैकीं आपल्याला योग्यशी एखादी एंगेज्ड करतां येईल ! '

' हां, हें ठीक ! ' चित्रा म्हणाली.

' आम्ही तिघींनींही आपला शृंगार इतका नखरेबाज नी भडक केला पाह्यजे कीं, जशा काय सिनेमांतल्या नटीच ! आमचा थाट पाहून

त्यांना वाटलं पाह्यजे कीं, या कांहीं सरळ चालीच्या बायका नसाव्यात. बोलणं चालणंही पण तसंच करायचं. किशाला मी हें सारं सांगून ठेवलंय्. त्यानंही आम्हांला वाटेल ती मदत करायचं कबूल केलंय्. तिघींनींही आपल्याजवळ एकेक अलीगडचा तीक्ष्ण धारेचा खंजीर लपवून ठेवला पाह्यजे !—'

'अय्या ! तो कशाकरितां ?' चित्रा भेदरून म्हणाली.

'आमचं मादक सौंदर्य नी मोहक दागिने यांचा मोह कुणाला होणार नाहीं ? आपण जुगारी लोकांच्या अड्ड्यांत जात आहोंत. वेळ आहे. प्रसंग आहे. आपलीं हत्यारं आपल्याजवळ असावींत. प्रसंग आला, तर चालवायला कमी करतां उपयोगीं नाहीं. आमच्या घरीं आहेत चार पांच खंजीर. त्यांपैकीं दोघींना दोन देतें मी. मधल्या वेळांत तो चालविण्याचं थोडंसं प्रॅक्टीस करून ठेवा !'

'ठीकाय्.' जयश्रीनें अनुमति दिली. अर्थात् चित्रेलाही ती देणें निरुपायानें भाग पडलें.

आणखी कांहीं भाषणें व बेत झाल्यानन्तर त्यांनीं आपली छोटीशी सभा बरखास्त केली व चित्रेला तिच्या घरीं पोंचवून सुरेखा आपल्या घरीं येऊन दाखल झाली.

दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं तीन वाजतां एक टॅक्सी मोहनमन्दिर हॉटेलच्या मागच्या दारापुढें येऊन उभी राहिली आणि तींतून तीन बुरखेवाल्या स्त्रिया उतरून त्या तडक आंत शिरल्या.

मागच्या दारानें आंत शिरलेलें तें चमत्कारिक गिऱ्हाईक पाहून हॉटेलमधल्या नौकरांची एकच धान्दल उडून गेली. त्यांपैकीं एकानें पुढें होऊन त्यांना विचारलें 'आपल्याला कोण पाह्यजे ?'

'हॉटेलचे मालक त्रिविक्रमपन्त !' सुरेखा उत्तरली.

भजाच्या पिठानें भरलेल्या हातानेंच तो आपल्या मालकाला बोलावण्याकरितां पळाला. एवढ्या वेळांत त्यांनीं तिथल्या परिस्थितीचें निरीक्षण केलें.

हॉटेलची मागील बाजू म्हणजे घाणीचें नुसतें आगर होतें. कुब-

लेले कांदेबटाटे व सडलेली भजीं, शेव यांची चोहोंकडे दुर्गंधी सुटली होती. तळकट तेलाचा वास घशांत शिरत होता. आपआपल्या कार्यांत रत असलेल्या नोकरांच्या 'निढळचा घाम' पदार्थांत पडून त्यांना एक प्रकारची विशिष्ट चव येत होती आणि नोकरांचे पंचे व सोघनीं तर इतकीं घाणेरडीं होतीं कीं, त्यांच्या साहाय्यानें तयार झालेले पदार्थ खाणारे लोक जगतात कसे, याचेंच आश्चर्य वाटत होतें. असलें तें ओंगळवाणें दृश्य पाहून त्या तिघींना तर ओकारीच आली.

इतक्यांत तिथें पन्त येऊन दाखल झाले आणि नम्रतेनें त्यांना म्हणाले, 'काय पाहिजे आपल्याला?'

'एकीकडे गुप्तशी जागा असल्यास, पन्धरावीस मिनिटं आम्हांला तुमच्याशीं कांहीं बोलायचंय्!' त्यांच्यावर कटाक्ष फेंकीत सुरेखा म्हणाली.

'हो हो, अवश्य अवश्य! चला माडीवर. रूम आहे तशी. या माझ्या मागून.' असें म्हणून ते पुढें सटकले व त्यांच्यामागून त्या माडीवरील एका रूममध्यें येऊन दाखल झाल्या. तिघींना तीन खुर्च्या देऊन व स्वतः त्यांच्यापुढें एका खुर्चीवर बसून 'हं, बोला आतां तुमचं काय तें!' अशा अभिप्रायानें ते त्यांच्याकडे पाहूं लागले.

आतां त्या तिघींनीं आपले बुरखे बाजूला केले. त्यांचें तें विलक्षण सौंदर्य व एकन्दर थाटमाट पाहून पन्त तर दिपूनच गेले. आणि या तीन 'अस्मान तारा' आपल्या हॉटेलांत गुप्तपणें कां आल्या असाव्यांत, याबद्दलची त्यांची उत्कण्ठा द्विगुणित झाली.

'तुमच्या हॉटेलांत बायका येतात?' सुरेखेनें विचारलें.

'आत्तांपर्यन्त कांहीं आल्या नाहींत. पण यापुढं आल्या तर आम्ही त्यांची उत्तम तऱ्हेची व्यवस्था करूं?' पन्त म्हणाले.

'आम्हा तिघींचेहि पतिराज दूरच्या प्रवासाला गेले आहेत. आम्ही घरच्या सम्पन्न असून एकट्याच आहोंत. आम्हांला घरीं करमत नाहीं. आम्ही मधून मधून तुमच्या हॉटेलांत स्पेशल रूममध्यें येऊन खेळत बसूं. वास्तविक एवढ्याकरितां कांहीं आम्हांला हॉटेलमध्यें येण्याची जरुरी नाहीं. नुसतंच खेळायचं झालं तर तिघींपैकीं कुणाच्याही घरांत आम्हांला खेळतां

येईल. परंतु आम्हांला खेळतां खेळतां निरनिराळीं खाद्यं पेयं लागतील तीं आयतीं घरांत कोठून मिळतील? कोण करणार? त्यापेक्षां हॉटेलांतच डाव माण्डला तर खेळच्या खेळ होऊन वाटेल तें खायला प्यायलाहि मिळेल! तेव्हां तुमच्या मनांत जर आम्हांला रूम द्यायची असेल, तर भाड्याचा वगैरे खुलासा—'

'हो, तशी रूम द्यायला कांहीं माझी हरकत नाहीं.' जरा खाकरून खोकरून पन्त पुढें म्हणाले, 'महिन्याची घ्याल तर भाडं—त्या हिशेबानं—थोडसं कमी पडेल. पण टेम्पररी घ्याल, तर रोजचा रुपया पडेल. महिन्याला पंचवीस रुपये द्यावे लागतील!'

'ठिकाय्. आत्तां महिन्याचे पैसे देतें. भाडेचिठ्ठी करा. पण आम्हाला कोणची रूम देणार?' सुरेखेनें विचारलें.

'तुम्ही म्हणाल ती!' पन्त आनंदानें म्हणाले, 'आतां आम्ही बसलों आहोंत, हीच रूम बरी आहे. दुसरीकडे कुठंही गलबला झाला तरी या रूममध्यें ऐकूं येत नाहीं कीं, तुमचे संवाद दुसऱ्याला ऐकूं जाणार नाहींत. ती समोरची रूमही चांगली आहे. मोकळी आहे. पण त्याला लागून असलेल्या दिवाणखान्यांत, रात्रीं कांहीं हौशी लोक जमतात. थोडासा दंगा, गडबड होते, त्यामुळं तुम्हाला त्रास होईल म्हणून—'

'तर मग तीच रूम द्या आम्हांला!' सुरेखा आनंदानं म्हणाली, 'मण्डळीच्या गलबल्याचा आम्हाला बिलकूल त्रास होणार नाहीं. उलट करमणूक होईल. नी मण्डळी 'रात्रीं' जमतात ना? आम्हाला कांहीं रात्रीं फारसं यायचं नाहीं. एकाद्या वेळीं आलों तर येऊं.'

'ती रूम घेण्याची इच्छा असेल तर ती घ्या. चला पहा.' असें म्हणून पन्त उठले आणि निघाले. त्यांच्यामागून त्याही निघाल्या. त्यांनीं ती रूम पाहिली. तीमधून दिवाणखान्यांत जाण्याकरितां एक दार होतें. पण तें बंद करून घेतलें होतें. त्याकडे बोट दाखवून जयश्री म्हणते, 'हें दार उघडलं, तर आपण दिवाणखान्यांत जातों नाहीं?'

'होय तर. वाटेल तर तें चांगलं पक्कं बन्द करून देतों.'

' कशाला ? असेना का. आंतून आम्ही कुलूप ठोकूं म्हणजे झालं!' चित्रा म्हणाली, ' वाटेल तर तुम्हीही बाहेरून ठोका ! '

' कांहीं नको. तुम्ही आंतून कुलूप लावा म्हणजे झालं! करूं आजच्या तारखेपासून भाडेचिठी ? '

' हं. करा. ' सुरेखेनें अनुमति देतांच पन्तांनीं रक्कम मोजून घेऊन, त्यांच्या हातावर भाड्याची पावती ठेवली आणि भाडेचिठी आपल्या रेकॉर्डला लावली.

' आम्ही नेहमीं मागच्या दारानं येऊं. रात्रीं आलों तरी चटकन् दार उघडण्याची व्यवस्था झाली पाह्यजे ! आमच्या येण्याचा कुठंही बोभाटा होतां कामा नये. कशा झालों तरी आम्ही कुलस्त्रिया आहोंत. साऱ्या नौकर लोकांना सांगून ठेवा ! ' जयश्री खणखणीतपणें म्हणाली.

' त्याबद्दल तुम्ही काळजी करूं नका. ' डोळे मिटून निश्चयात्मक स्वरांत पन्त म्हणाले, ' गिऱ्हाइकाची सुखसोय पाहणं हें आमचं कर्तव्यच आहे. तें आम्ही पार पाडलं नाहीं तर आम्ही धन्दा तरी कशाला करावा ? तुम्ही म्हणाल त्याप्रमाणं आम्ही तुमची व्यवस्था करूं. त्याप्रमाणं मी सर्वांना ताकीद देऊन ठेवतों ! '

' येतों तर आम्ही आतां. ' असें म्हणून सुरेखा उठली आणि आपल्या मैत्रिणीसह पन्तांचा निरोप घेऊन टॅक्सींतून पसार झाली. ती गेल्यानन्तर पन्तांनीं मॅनेजरला बोलावून माडीवरील दहा नम्बरची रूम एंगेज्ड झाल्याचें व त्या गिऱ्हाइकाशीं कसें वागायचें तें सविस्तरपणें सांगितलें.

छबूच्या कानावर ही बातमी ताबडतोब गेली. तिला आश्चर्य वाटलें. तिनें लागलीच पन्तांची गांठ घेतली आणि ती म्हणाली, ' तिघा स्त्रियांनीं महिन्याच्या भाड्यानं माडीवरची रूम घेतली, ही गोष्ट खरी का ? '

' हो, घेतली. आतांच भाडेचिठी करून घेतली. '

' नांवं काय त्यांचीं ? '

' एकीनंच आपल्या नांवावर खोली घेतलीय्. काय बरं तिचं नांव ? हं, ' सुषमा सुन्दरराव शृंगारपुरकर. ' दुसऱ्या दोघींचीं नांवं मी विचारलीं नाहींत न् त्यांनींही पण सांगितलीं नाहींत ! '

‘ आपल्या हॉटेलमधें त्यांनीं कां बरं रूम घेतली असावी ? ’

‘ नाना तऱ्हेचे रंगढंग करण्याकरितां ! ’

‘ काय म्हणतां ? ’

‘ माझी कल्पना खोटी ठरली तर पुन्हा बापाचं नांव सांगणार नाहीं ! त्या तिघी चटकचान्दण्या किती मोहक न् नखरेबाज आहेत म्हणून सांगूं ? दुर्दैव त्या बिचाऱ्या नवऱ्यांचं ! उफाळतं तारुण्य, गडगंज श्रीमन्ती अन् नावरतं विलासी मन, इतकीं जणं एकत्र झाल्यावर मग रंगढंगाला काय कमी ? त्यांनीं जरी आपला भाव प्रत्यक्ष प्रगट केला नाहीं, तरी त्यांच्या एकन्दर वागणुकीवरून मी तेव्हांच तें ताडलं ! खेळण्याचं केवळ वरवरचं निमित्त आहे. कांहीं दिवस त्या फक्त तिघीजणीच खेळतील. पण नन्तर हळूहळू त्यांचे ‘ लव्हर्स ’ ही तिथं जमूं लागतील. ‘ नवरे प्रवासाला गेलेत ’ ही सुद्धां निवळ थाप आहे ! नवऱ्यांना न कळत या तीघी छानछबेल्या दहा नम्बरच्या रूममधें पहिल्यानम्बरची मजा मारणार दुसरं काय ? ’

‘ पण मला वाटतं, यामुळं आमच्या हॉटेलावर कांहींतरी संकट येण्याचा सम्भव आहे. पन्नास ‘ पुरुषां ’च्या भानगडी सहज खपून जातात; परन्तु एखाद्याही ‘ स्त्री ’ची भानगड अनर्थ करते !—गांवांतल्या या कुणाच्या कोण आहेत कोण जाणे ! यांच्या पायांत भाण्डणतण्टे होऊन खुनाखुनीपर्यन्त पाळी आली नाहीं म्हणजे मिळविली ! त्यांनीं कांहीं केलं तरी त्यांना अडाणी म्हणतील; पण त्यांना असल्या कामाकरितां जागा दिल्याबद्दल तुम्हाला मात्र सारे लोक महामूर्खांत काढतील ! तेव्हां, पहा, सम्भाळा, अजून तरी ही भाडेचिठ्ठी रद्द करा ! ’

‘ छे: छे: छबू, तूं फारच भित्री बुवा ! अग, या स्त्रियांच्यामुळं आमचं नशीब किती शिकन्दर बनणार आहे, याची तुला कल्पना नाहीं ! यांनासुद्धां दारूची न् जुगाराची चटक लावूं. ती एकदा लागली कीं, या तीन्ही फक्कड पांखरांची सम्पत्ति लुटायला आम्हांला कितीसा उशीर लागणार ? पांचपन्नास हजारांना तर सहज लोळवूं ! शिवाय या चटकदार, छटेल मैनांच्या उन्मादक तारुण्यावर आम्हांला भरपूर कमिशन मारतां येईल तें निराळंच. सावधगिरीनं फायदा लुटतां येईल तेवढा लुटूं अन्

बोभाटा होतोय् असा संशय आला कीं, त्यांची इथून हकालपट्टी करूं म्हणजे झालं !– ते तिघे ' उल्लूके पठ्ठे ' तुझ्या सौन्दर्यावर बेहद्द खूष आहेत. जोंपर्यंन्त हें मर्यादेंत आहे, तोंपर्यंन्त सारं ठीकाय्. पण जर का त्यांचं मन बेफाम होऊन उधळलं, तर तूं कसं करशील ? अंगाला हात लावूं देशील ? नाहीं ! मग त्यांना तरी तूं किती दिवस भ्रमांत ठेवणार ? आज नाहीं उद्यां हा भ्रमाचा भोपळा फुटणार, अन् ते निराश न् नाराज होणार. त्यापेक्षां तुझ्यावरचं त्यांचं मन उडण्याकरितां या नखरेल नटव्या त्यांना दाखविल्या न् त्यांचं न् त्यांचं जर जुळलं, तर तुझ्यावरचं त्यांचं गण्डान्तर टळून आपल्याला दोन्ही पक्षांकडून पैसा लुटायला सांपडणार नाहीं का ? ती सुषमा लक्षाधीश; इकडे सर्वोत्तमरावही लक्षाधीश; मग आम्हांला हें हॉटेल घालून भर्जी तळायची तरी काय ग जरूरी ? आम्ही लक्षाधीश नाहीं, तरी अर्धलक्षाधीश तरी खचित होऊं ! '

अशा प्रकारचे युक्तिवाद लढवून त्रिविक्रमपंतांनीं छबूच्या गळीं आपले सिद्धान्त उतरविले व तिच्या कडून कबूलीजबाब घेतला खरा. पण तेवढ्या नें कांहीं तिचें समाधान झालें नाहीं. उलट तिच्या मनाला रुखरुखच लागून राहिली. काय असेल तें असो; या तीन स्त्रियांचें हॉटेलांत येणें तिला कांहीं मनापासून आवडलें नाहीं. त्यांच्या येण्यां-पासून त्रिविक्रमपन्तांचें नाहीं, तरी खास आपलें कांहींतरी भयंकर नुक-सान होणार, असें तिच्या मनाला राहून राहून वाटूं लागलें. तिचें नुकसान ! छबूचें असें कोणतें नुकसान होणार होतें ? केवळ ' डाव ' म्हणून सर्वोत्तमावर तिनें जादूची फुंकर मारली होती खरी; पण सध्यां तिचा डाव तिच्यावरच उलटला होता ! कारण कपट करतां करतां खरो-खरीच तिचें मन सर्वोत्तमाकडे ओढ घेऊं लागलें होतें. ती आवरण्याचा प्रयत्न करीत होती. परन्तु तिला यश येईल असा रंग दिसेना. अशा स्थितींत सुषमा सर्वोत्तमाच्या दृष्टीला पडली आणि त्यांचें प्रेम जुळलें तर ? तर मग आपली वाट काय ?—आणि याच संशयानें तिला त्या दिवशीं खाणेंपिणें सुचलें नाहीं, तिचा जीव खेळण्यांत रमला नाहीं कीं, तिला रात्रीं झोंपही आली नाहीं !

## : १२ : हृदयाविष्करण !

त्रिविक्रमपन्तही अलीकडे अस्वस्थच होते. कारण आपण व छबू या दोघांनीं मिळून सर्वोत्तमावर फेंकलेलें कपटजाल स्वतःवरच उलटून स्वतःच्या गळ्याला फांस लागेल, अशी त्यांची कल्पना नव्हती. स्वतःवर असलेल्या छबूच्या निस्सीम प्रेमाबद्दल त्यांना पूर्ण खात्री होती. परंतु गेल्या आठ दहा दिवसांत जे प्रकार त्यांच्या सूक्ष्म दृष्टीला दिसून आले होते, त्यांवरून छबूच्या एकनिष्ठेबद्दल त्यांना संशय येऊं लागला होता. निव्वळ पैसे उकळण्याकरितां आपण छबूला जी दिशा दाखविली ती दाखविली नसती, तर बरें झालें असतें, असें आतां त्यांना वाटूं लागलें होतें. छबूबद्दल त्यांना निश्चिती होती, म्हणूनच त्यांनीं हें धाडस केलें होतें. पण त्यांचा डाव आतां सपशेल फसण्याचा रंग दिसूं लागला होता.

स्वतःची व सर्वोत्तमाची ते तुलना करूं लागले, तेव्हां प्रत्येक बाबतींत आपण त्याच्या किती तरी मागें आहोंत, असें त्यांना दिसून आलें. 'सर्वोत्तम ऐन तरुण, तर आपण प्रौढ; तो रूपसुन्दर, तर आपण त्या मानानं कुरूपच; तो लक्षाधीश, तर तसं व्हायला आपल्याला दोन तीन जन्म घालवावे लागतील; तो मान्यमान्यतेचा सभ्य नागरिक, तर आपण भजीविक्या हॉटेलवाला; तो रसिक रंगेल, तर आपण पैशाच्या मागं लागलेला हमाल. त्याच्या घरीं मोटारी उडतायत्, तर आपल्या घरीं 'बाबागाडी' सुद्धां नाहीं; त्याच्या घरीं दागदागिन्यांचा ढीग, तर आपल्याकडे जेमतेम मुठींत मावतील इतकेच; दोघांचंही तिच्यावर खरंखुरं प्रेम; पण एक तिच्या सौंदर्याचा उपयोग पैसे मिळविण्याकडे करणार, तर दुसरा तें फक्त

स्वतःच रसिकपणें उपभोगणार; आपणा दोघांत इतकी तफावत असल्या-मुळं तिचं प्रेम त्याच्या दिशेकडे कां वळणार नाहीं?

छबू सर्वोत्तमाशीं विवाह करील का? काय हरकत आहे? माझ्याशीं कुठं तिचा विवाह झालाय्? ती पूर्ण स्वतन्त्र आहे. पण सर्वोत्तमाचं लग्न झालंय्. म्हणून काय झालं? मुलंबाळं झालेल्यासुद्धां लग्नाच्या बायकोच्या नरडीवर पाय देऊन, एखाद्या प्रेमपाश फेंकणाऱ्या, परक्या स्त्रीला पत्नीपदावर चढविण्याची अमानुष प्रथा हल्लीं महाराष्ट्रांत मोठमोठ्या पण्डितपशूंनीं पाडली नाहीं काय? दचका, भीति, अब्रूची चाड काय ती पहिल्यान्दाच असलं कर्म करणाऱ्याला; दुसऱ्याला त्यापेक्षां कमी; तिसरा बराचसा निर्लज्ज; चौथा बेगुमान; पांचव्याचा याच कृत्याबद्दल बेम्व्रीच्या देंठापासून जयजयकार; झाला राजमार्ग मोकळा! आतां सर्वोत्तमाला दुसरं लग्न करतांना लाजलज्जा वाटणार नाहीं. उलट 'प्रेमाचा सन्मान केला' म्हणून त्याला धन्यताच वाटेल आणि या नीतिधैर्याबद्दल जनता त्याचा जयघोषच करील!

अशा तऱ्हेनं छबू आपल्या हातून निसटल्यावर आपली वाट काय होईल? पोटाला काय कुठंहि मिळेल; पण प्रेमपिपासा कशी भागणार? अन् तिच्या द्रव्याचाहि उपभोग घ्यायला कसा मिळणार? कदाचित् माझ्या मनाला वाईट वाटूं नये म्हणून सर्वोत्तमाकडे जातांना ती आपला सारा पैसा अडका मला देईल; सर्वोत्तम भक्कम श्रीमंत असल्यामुळं त्याची तिला फारशी पर्वा वाटणार नाहीं; पण त्या पैशानं माझ्या मनाचं समाधान होईल का? पैशानं मनुष्याच्या वासना, भावना तृप्त होतात कां? हृदयाच्या जखमा पैशानं भरून येतील का? छबूच्या विरहानं तळमळणारा जीव पैशानं कसा शान्त होईल? त्याला जगांत दुसरा उपाय नाहीं! छबूच्या विरहावर 'छबूचं गाढ प्रेमालिंगन' हेंच रामबाण औषध!'

अशा तऱ्हेच्या नाना विचारांनीं त्रिविक्रमपन्तांच्या डोक्यांत काहूर माजून हल्लीं त्यांना अन्नपाणीहि गोड लागेनासें झालें होतें आणि त्यांची झोंपहि उडाली होती. त्यांना काय करावें, कसें करावें हें सुचेना आणि हा डावाचा उधळलेला वारू कसा आवरावा, हेंहि समजेना.

परन्तु सौ. सुषमा शृंगारपुरकर या तरुणीनें हॉटेलामधील खोली ठरविल्यापासून त्यांच्या आशेला पालवी फुटली आणि हें गिरेबाज कबूतर सर्वोत्तमाला भुलविणार, आणि आपली छबू त्याच्या पकडींतून सुटणार, याबद्दल त्यांना खात्री वाटूं लागली. कारण छबूपेक्षां सुषमा कितीतरी पटीनें अधिक मनोहर होती. याच आनन्दाच्या भरांत ते होते. ते इतके कीं, या तीन स्त्रियासम्बन्धानें त्यांनीं आपल्या मनांत दुसरा कोणताच विचार येऊं दिला नाहीं कीं, त्यांच्या सम्बन्धानें त्यांना कसला संशयहि आला नाहीं.

'सर्वोत्तमराव काय छटेल माणूस. जिकडे बहारीचं सौन्दर्य दिसणार तिकडे तो वळणार. छबूंत घरच्या पत्नीपेक्षां अधिक मोहकता दिसली असेल, म्हणून तो पत्नीचा विश्वासघात करून तिच्यावर आषक्त झाला. उद्यां सुषमा छबूपेक्षां अधिक खूपसुरत आहे, असं त्याला दिसून येतांच तो तिला लाथाडून सुषमेच्या नादाला लागल्यावांचून राहणार नाहीं. त्याचं प्रेम एकनिष्ठ असत, तर त्यानं लग्नाच्या बायकोला फशीं पाडलंच नसतं. त्यांतून सुषमा शृंगारपुरकर गांवांतल्या एका श्रीमन्त, सभ्य, गृहस्थाची बायको आपल्याला लाटायला सापडतेय्, असं दिसून येतांच त्याला अतिशय आनन्द होईल. नवऱ्याच्या बायका नवऱ्याला सोडून आपल्यावर आषक्त होतायुत अन् आपल्याला गुप्तपणें वरायला तयार आहेत, असं पाहतांच कोणत्या रंगेल माणसाला आनन्द होणार नाहीं? कारण या आनन्दाची खुमारी फार निराळीच असते. इतकंच नव्हे, तर त्यांत एक प्रकारची निशा असते. मग त्या धुन्दींत तो प्रेमवेडा स्वतःच्या अप्सरेसारख्या सुस्वरूप स्त्रीला एकीकडे सारून, चोरटेपणानं स्वतःकडे येणाऱ्या कुरूप स्त्रीलाही आनन्दानं मिठी मारायला तयार असतो! मग इथं तर काय सुषमा छबूपेक्षां शतपटीनं—नव्हे—सहस्रपटीनं सुन्दर!—पण सुषमा सर्वोत्तमावर आषक्त होईल कां? खात्रीनं झालीच पाहाजे! नाहीं झाली, तर तसा प्रयत्न करूं. पण ती सर्वोत्तमाच्या स्नेह्याची पत्नी निघाली तर? छे. छेः असल्या छिनाल स्त्रीचा पति सर्वोत्तमाचा स्नेही असणं शक्य नाहीं!'

एकन्दरींत हॉटेलांत सुषमेचें येणें त्रिविक्रमपन्तांच्या पथ्यावर असल्यामुळें त्यांनीं त्या तिघींची व्यवस्था अतिशय उत्तम प्रकारें ठेवली. एक दोन, एक दोन दिवसांनीं त्या तिघी सन्धि साधून मोहनमन्दिरांतील आपल्या खोलींत येत; चहा, चिवडा, भजीं, शेव मागवीत, पण न खातां गुप्तपणें त्यांची विल्हेवाट लावीत; ब्रिझिक झोडीत आणि कण्टाळा आला म्हणजे टॅक्सींतून कुठें तरी फरारी होत.

त्यांच्या सरबराईच्या निमित्तानें छबूनें जेव्हां त्यांची पहिली भेट घेतली, तेव्हां त्या तिघींचें सौन्दर्य व तो थाट पाहून तर ती दिपूनच गेली. आणि सर्वोत्तमाला आपल्या काबूंत ठेवण्याच्या शर्यतींत, त्यांतल्या त्यांत सुषमा तर आपल्याला दाद देणार नाहीं, याबद्दल तिची खात्री होऊन तिच्या चेहऱ्यावर एकदम विषण्णतेची छाया पसरली. ती इतकी कीं, त्याबद्दल सुषमेला सुद्धां संशय आला आणि ती म्हणाली, ' छबू-ताई, तुम्ही रूममधें आलांत, त्या वेळीं कशा टवटवीत दिसत होतां नी इतक्यांत तुमचा चेहरा कोमेजायला काय झालं ? कांहीं तरी भयंकर धक्का बसावा, तशी तुमची चर्या दिसतेय् !'

' छेः छे: काय झालंय् मला ?' आपला चेहरा पदरानें पुसत छबू खिन्नपणें म्हणाली, ' तसा निवळ भास झाला तुम्हाला तो !' असें म्हणून ती एकवार खुदकन् हांसली. पण पदरानें पुसून चेहऱ्यावरची खिन्नता कशी जाणार ? आणि हास्याचें आवरण घातलें, तरी ती छपून कशी राहणार ?

पुढें सुषमेचें व छबूचें बरेंचसें संभाषण झालें. पण त्या दोघीही एकमेकींपासून कांहीं तरी चोरून ठेवीत आहेत, असें दोघींच्याही लक्ष्यांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

आत्तांपर्यन्त छबूनें सर्वोत्तमाजवळ आपला खरा आशय, आपलें हृदयस्थ प्रेम प्रगट केलें नव्हतें. हावभावांनीं, कृतीनें ती तसें त्याला झाणवीत होती. पण प्रत्यक्ष असे शब्द तिच्या मुखांतून निघाले नव्हते. तिला तसें धैर्यच झालें नव्हतें. त्याच्याशीं वागतांना तिचा कृत्रिम

व्यापारी बाणा केव्हांच नाहींसा होऊन त्याची जागा त्याच्या विषयींच्या खऱ्याखुऱ्या प्रेमानें घेतली होती. आतां कृत्रीमतेला मुळींच वाव नव्हता. हा फरक सर्वोत्तमाच्याही लक्ष्यांत आल्यावांचून राहिला नाहीं; आणि तिच्यावर आषक असलेल्या जगदीश–श्रीनिवासांच्याही ध्यानांत आल्यावांचून राहिला नाहीं. आतां सर्वोत्तमाला तिच्या आगतस्वागतांत, तिच्या सेवेंत एकप्रकारची निराळीच जिवन्त माधुरी वाटूं लागली. त्यामुळें तो तिच्यावर सध्यां बेहद्द खूष होता.

सन्धि साधून, सुषमेची सर्वोत्तमावर मगरमिठी बसायच्या आंत, त्याच्याजवळ आपला भाव प्रगट करायचा आणि हरतऱ्हेनें त्याच्यावरची आपली पक्कड खम्बीर करायची आणि वेळ येतांच त्रिविक्रमपन्ताचा सम्बन्ध सोडायचा, असा तिनें आपल्या मनाशीं विचार ठरविला. पण तशी तिला सन्धीच सापडेना. कोणी ना कोणी तरी त्याच्याजवळ हजर असत. तिला अनुकूल एकान्त असा मिळेना आणि तिच्या हृदयाची तळमळ कांहीं थाम्बेना. पण लवकरच एका दिवशीं किंवा एका रात्रीं तिला तशी सन्धि लाभली आणि ठरल्याप्रमाणें तिनें आपला डाव टाकला.

ज्या रात्रीं एकान्तीं छबू व सर्वोत्तम यांचा संवाद झाला, त्याच रात्रीं कर्मधर्मसंयोगानें आमचें ललनात्रिकूटही आपल्या पतिराजांच्या मागोमाग आपल्या खोलींत हजर असून, त्याला दाराच्या फटींतून दिवाणखान्यांतील चित्र स्पष्ट दिसत होतें आणि सम्भाषण तर कानांत बोलल्याप्रमाणें ऐकूं येत होतें. तें त्रिकूट खोलींत हजर आहे, हें जर छबूला माहीत असतें, तर तिनें आपल्या तोण्डांतून ब्र शब्दही काढला नसता. पण तिचें दुर्दैव, दुसरें काय ?

आज रात्रीं रोजच्याप्रमाणें सर्वोत्तम हॉटेलमधल्या वरच्या दिवाणखान्यांत येऊन दाखल झाला होता. पण जगदीश व श्रीनिवास मात्र अजून आले नव्हते. त्रिविक्रमपन्त कांहीं महत्त्वाच्या कामांत खालीं गुन्तले होते.

सर्वोत्तम बैठकीवर बसतो न बसतो तोंच तिथें छबूही आली. आपलें कार्य साधण्यास ही सन्धि योग्य आहे, असें तिला दिसून येतांच तिला आनन्द झाला. पण तिची छाती धडधडूं लागली. ती बोलण्याचा प्रयत्न करूं लागली, पण तिच्या तोण्डांतून शब्द फुटेना व आरम्भ कसा करावा हेंहि तिला समजेना. तिचा चेहरा गोरामोरा झाला आणि तिच्या काळ्याभोर, पाणीदार डोळ्यांतून दोन अश्रुबिन्दु घळकन् निखळले आणि त्यांनीं तिच्या गुलाबी गालावर उड्या घेतल्या.

इवलेसे, दोनच अश्रुबिन्दु, पण तेवढ्यांनीं सर्वोत्तमाच्या अन्तःकरणाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडविल्या. अबलांच्या एखाद्या, चिमुकल्या अश्रुबिन्दूंत पाषाणहृदयेंही शतशः चूर्ण करण्याचें जें अजस्र सामर्थ्य आहे, तें फ्रान्स बेचिराख करणाऱ्या जर्मनीच्या हाविट्झर तोफांत किंवा कॅण्टन उध्वस्त करणाऱ्या जपानी बॉम्बूसमध्येंही नाहीं !

छिन्नविच्छिन्न हृदयानें सकम्प स्वरांत सर्वोत्तम म्हणाला, ‘छबूताई ! तुला—तुम्हाला काय झालं रडायला ? तुमच्या डोळ्यांत कां अश्रु ?’

त्याच्या मुखांतून वरील शब्द बाहेर पडतात न पडतात तोंच छबूनें एक नावरता हुन्दका दिला आणि तिच्या डोळ्यांतून आणखी दोन मोती ओघळले.

‘बोला, संकोच करूं नका. बोला !’

ती चटकन् उठली आणि तिनें हुन्दके देत देत सर्वोत्तमाचे घट्ट पाय धरले आणि त्याच्या पायांवर आपलें मस्तक ठेवून व आपल्या अश्रूंनीं त्यांना न्हाऊं घालून ती त्याला म्हणाली,—‘क्षमा करा हो, मला क्षमा करा !’

या अकल्पित प्रकारानें तो गांगरून गेला. त्याला पुढें कसें वागावें, हें समजेना. तरी पण चटकन् थोडासा धीर धरून व तिला उठवून तो म्हणाला, ‘छबू ! असं काय आज वेडयासारखं करतेस ?’

‘हो, खरोखरीच मी तुमच्याकरितां वेडी झालेंय् ! मला तुम्ही क्षमा केल्यावांचून माझ्या मनाला समाधान होणार नाहीं ! कराल का हो

तुम्ही माझ्यावर दया!' असें म्हणून तिनें त्याला भावनेच्या भरांत एकदम मिठी मारली आणि त्याच्या छातीवर मान टाकून ती अविरतपणें अश्रु गाळूं लागली.

सर्वोत्तमाला छबूचा आतांपर्यंत अनेकवेळां स्पर्श झाला होता. परन्तु तो केवळ 'हाताला हात' लागण्यापुरताच होता. परन्तु इतका गाढ, इतका भावनामय, इतका शृंगारोत्तेजक, इतका उन्मादक एकान्तांतील स्पर्श—स्पर्श कसला? गाढालिंगनच तें!–असा हा पहिलाच होता. पहिल्याक्षणीं त्याचें अन्तःकरण थरारून गेलें. पण दुसऱ्या क्षणीं त्याला अतिशय आनन्द झाला. ज्या प्रेयसीनें नुसता हस्तस्पर्श केला, तरी तो खूष असे, त्या प्रेयसीचें असें अचानक गाढालिंगन मिळतांच, अशा प्रकारें त्याची अनेक दिवसांची इच्छा पूर्ण होतांच त्याला ब्रम्हानन्द कां होणार नाहीं?

ती तर खरोखरीच वेडी झाली होती; पण तोही वेडा झाला. त्यानें तिचें मनोहर मुख वर केलें आणि त्याचें एक भरदार चुम्बन घेऊन तो तिच्याकडे पाहत म्हणाला, 'छबू! कसला अपराध न् कसली क्षमा?'

ती यावेळीं थोडीशी सावध झाली आणि तिनें चोहोंकडे एकदा घाबऱ्याघुबऱ्या दृष्टीनें पाहिलें. तोहि भानावर आला आणि थोडासा लज्जित होऊन, तिच्यापासून जरा बाजूला बसला. 'आपण भावनेच्या भरांत एकदम हें काय केलें?' अशा तऱ्हेचे विचार दोघांच्याहि चेहऱ्यावर स्पष्टपणें उमटलेले यावेळीं दिसत होते.

'आज मला आपल्यासमोर माझं हृदय खुलं करायचंय्!' खाली मान घालून कातर स्वरांत ती म्हणाली, 'मी आपला भयंकर अपराध केलाय्! मी ज्या वेळीं आपल्यावर प्रेम करूं लागलें, त्यावेळीं माझं हृदय शुद्ध नव्हतं; मूळची शुद्ध, निर्मल न् मधुर असणारी एखादी नदी कांटेकुटे, शेवाळ, विषारी मुळ्या नी केरकचरा यांनीं जशी गढूळ न् दुर्गन्धित अर्थात् कुचकामी होऊन जावी, त्याप्रमाणं माझी मनोवृत्ति अव-

पेंच, कपट इत्यादि क्षुद्र विकारांनीं गढूळ झालेली होती. तुम्हाला खोट्या प्रेमपाशांत अडकवून फक्त तुमच्याकडून पैसा लुबाडावा, एवढाच माझा प्रथम हेतू होता. परन्तु तुमच्या अनेक सुन्दर सद्गुणांनीं माझे डाव धुळीला मिळून मीच तुमच्या चरणाची दासी झालें! तुमच्या पुण्याईचा जय झाला अन् मी पापिणी मात्र पुरी पराजित झालें! आतां हृदयांतले सारे क्षुद्र विकार नाहींसे होऊन केवळ आपल्याविषयींचं शुद्ध प्रेम तेवढं त्यांत शिल्लक उरलंय्! तर आतां या अनुतापदग्ध अबलेवर दया करून तिच्याकडे कृपादृष्टीनं पहावं, एवढीच या पायाजवळ विनन्ति आहे!' असें म्हणून तिनें डोळ्यांतून अश्रुधारा वाहात असतांनाच पुन्हां त्याच्या पायांवर डोकें ठेविलें.

'छबू! आतां नाहींना तुझ्या हृदयांत कपट?'

'वाटेल तर हृदय चिरून पहा नी त्यांत तें आपल्याला आढळून आलं, तर आपण मला वाटेल तें शासन करा!'

'पण तुझं लग्न—'

'नाहीं. माझं अद्याप लग्न व्हायचंय्!'

'ठीकाय्. तर मग, छबू, मी तुझ्या मागच्या सर्व अपराधांची क्षमा करून, तुझा स्वीकार केला म्हणून समज!'

'मला अन्तर नाहींना देणार? दुसरी एखादी दिसली, तर—'

'लग्नाच्या बायकोचा तरी त्याग करतां येत नाहीं. ती आणि तूं यांच्याशिवाय या जन्मांत मी तिसऱ्या स्त्रीकडे पत्नी या नात्यानं पाहीन तर'—

'नका नका, शपथ घेऊं नका! तुमच्या वचनावर माझा विश्वास आहे' सर्वोत्तमाच्या तोण्डावर एकदम हात ठेवून छबू म्हणाली. आतां तिचा चेहरा प्रफुल्लित दिसूं लागला.

सर्वोत्तमाच्याही चेहऱ्यावर 'आपली अनेक दिवसांची मनकामना पूर्ण झाली' या भावनेची स्पष्ट छटा उमटली. यानंतर त्यांचीं आणखी कांहीं भाषणें झाल्यावर तिथें जगदीश व श्रीनिवास आले. पण ते छबूला अगदीं सर्वो-

त्तमाच्या जवळ व एकांतीं बसलेली पाहून थोडेसे दचकले. कोणी सूक्ष्म तऱ्हेनें त्यांच्याकडे पाहिलें असतें, तर त्याला जगदीशानें एक दीर्घ सुस्कारा सोडलेला व श्रीनिवासानें अधरदंश केलेला स्पष्टपणें दिसून आला असता.

ते बैठकीवर बसल्यावर सर्वोत्तमानें त्यांना प्रश्न केला, 'अरे, इतका वेळ होतां कुठं तुम्ही?'

'अशीच एक पेठेंतून चक्कर मारून आलों,' जगदीश म्हणाला, 'म्हणून आम्हांला थोडासा उशीर लागला!'

इतक्यांत त्रिविक्रमपन्तही आले. इतर मंडळीही जमली आणि त्यांचा रोजच्याप्रमाणें दारू, जुगार, शृंगार, खेळ, खाद्यपेयसमाचार इत्यादि कार्यक्रम सुरू झाला.

आमच्या ललनांनीं हे सारे प्रकार प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिले आणि त्यांचे पती घरीं यायच्या आंत त्यांनीं सन्तप्त हृदयानें आपलें घर गांठलें.



: १३ :

# नवे सुन्दोपसुन्द!

सर्वोत्तमाच्या आणि छबूच्या प्रणयलीला पाहतांच—त्यांतल्या त्यांत तिनें त्याला मारलेली मिठी आणि त्यानें तिचें घेतलेलें चुम्बन पाहतांच तर सुरेखेच्या अंगाची आग आग—नव्हे—भडका उडाला. आणि स्वतःच्या पतिराजासम्बन्धीच्या तिच्या साऱ्या पूज्य कल्पना पार धुळीला मिळाल्या. जणुं काय सर्वोत्तमाच्या काळयाकुट्ट पापानेंच तिच्या डोळया-पुढें क्षणमात्र अन्धारी आली, पण लागलीच ती सावध झाली. सन्तापानें तिच्या नेत्रांतून जळजळीत अश्रुबिन्दु ठिबकूं लागले. ते तिला आवरण्याचेंही भान राहिलें नाहीं. तिनें रक्त निघे तो कडकडून अधरदंश केला. तिच्या नसानसांतून अधणासरखे कढत रक्त वाहूं लागलें. ती उसळीसरशी ताडकन् उठली. तिच्या मनांत बाहेरच्या दिवाणखान्यांत जाऊन छबूच्या कमरेंत एक लाथ मारायची होती आणि सर्वोत्तमाचा कान धरून त्याला भर बाजारांतून घरीं न्यावयाचें होतें. परंतु हा तिचा उद्देश जयश्री व चित्रा यांच्या ध्यानांत येतांच, आत्तांपर्यंत उभारलेलें सारें कारस्थान रसातळाला जाईल आणि सारेंच गाडें फसेल, इतकेंच नव्हे तर सर्वांचेंच संसार अशानें धुळीला मिळतील, या भयानें त्यांनीं चटकन् तिचा हात धरला आणि तिला खालीं बसविलें. व हळूच जयश्री तिच्या कानांत म्हणाली, ‘ सुरेखाताई ! आपण सध्यां फक्त ‘ पाहण्या ’ करितां आलों आहोंत; ‘शिक्षा’ देण्याकरितां आलों नाहीं ! तुम्ही आमच्या पुढारी ना ? मग तुम्हीच आपलं डोकं बेताल होऊं देऊं लागलांत, तर मग आम्ही अनुयायांनीं काय करायचं ? यांना वठणीवर कसं आणायचं तें ठरविलंच आहे; मग कां बरं अवेळीं ही गडबड ? ’

स्वरानें कोमल, पण अर्थानें सणसणीत अशी जयश्रीचीं वाक्यें

कानावर पडतांच सुरेखेचा आवेश बराचसा ओसरला आणि ती तिच्या गळां पडून, कोणाला ऐकूं न जाईल अशा तऱ्हेनें स्फुन्दत म्हणाली, 'जयश्रीताई!' आमचे पतिराज बिघडलेत, याबद्दल माझी खात्री होतीच; पण त्यांची प्रगति इथपर्यन्त झाली असेल, अशी मात्र माझी कल्पना नव्हती हो! पतीचं असलं दुष्कृत्य प्रत्यक्ष डोळयांनीं पाहून कोणती पत्नी भानावर राहील? पण तुम्ही मला सावध केलंत, हें फार चांगलं केलंत; नाहीं तर आम्ही आतांपर्यन्त केलेले सारे धाडसी प्रयत्न व्यर्थ गेले असते!'

यानन्तर चित्रेनेंही एक दोन समजुतीच्या गोष्टी सांगितल्यावर तें त्रिकूट दिवाणखान्यांतील लीला 'गम्मत की बाजा देखो' या पद्धतीनें पाहूं लागलें.

सर्वोत्तम घरीं यायच्या आंत सुरेखा आपल्या बंगल्यांत आली आणि अपरात्रीं बाहेर राहण्याबद्दल नौकरलोकांना कांहीं तरी थापा देऊन तिनें थेट आपलें शयनमन्दिर गांठलें आणि धाडदिशीं आपलें अंग शय्येवर आदळलें. अजूनही तिचें अंग शान्त झालें नव्हतें. उलट रसरशीत निखाऱ्यावर पापड भाजल्याप्रमाणें तें सन्तापाग्नींत होरपळून निघत होतें. पूर्वी पति मृत झाल्यावर स्त्रिया जिवन्तपणीं जाळून घेऊन सती जात असत. त्या स्त्रियांना काय यातना होत असतील, याची आतां तिला कल्पना आली. तिचें अंग तर पेटत होतेंच, पण छातींत कसले तरी धक्के बसत होते, ओंठ थरथर कांपत होते, डोकें सुन्न झालें होतें आणि मन चक्राकार गिरक्या खात होतें.

यावर एकच उपायः भरपूर अश्रुविमोचन! आतां ती मनसोक्त अश्रु गाळूं लागली. अश्रुरूपानें शरीरांतील व मनांतील बरेंचसें तीव्र विष निघून गेल्यावर तिला जरा बरें वाटलें व ती थोडीशी विचार करण्याइतकी भानावर आली.

पतिविषयक सन्तापाचा पूर ओसरल्यावर त्याची जागा तिरस्कारानें घेतली. आतां तिला सर्वोत्तमाचा तिरस्कार वाटूं लागला. तिला वाटलें, 'झाला इतका संसार बस्स झाला! आतां या विश्वासघातकी,

कपटी, पापी, प्रेमशून्य, भ्रष्ट पुरुषाला ' पति ' म्हणणं, म्हणजे त्या पवित्र शब्दाची विटम्बना करण्यासारखं आहे!'

आतां याचा कायमचा त्याग करून आपण माहेरीं किंवा कुठं तरी दूर दूर–जिथं याचं दर्शन–नव्हे–नांव सुद्धां कानावर पडणार नाहीं–अशा ठिकाणीं जाऊन एखाद्या विधवेप्रमाणं हें आयुष्य घालवावं नी कण्टाळा आलाच तर देहाचं विसर्जनही करावं! ' आपला ' होता तो पति 'दुसरीचा' झाला. आतां आपल्यास ' सुवासिनी ' म्हणवून घेण्याचा काय हक्क आहे? आपण ' विधवा 'च झालों नाहीं का?' तिचा निश्चय झाला, ' उद्यांच्या उद्यां संसार सरणावर ठेवायचा नी सौभाग्याचं मडकं फोडून नी घराला तीन फेऱ्या घालून नवऱ्याच्या नांवानं ओरडत कुठं तरी दूर जायचं!' एकदाचा आपला पक्का निश्चय ठरला, याबद्दल तिला तशा स्थितींतही समाधान वाटलें आणि तिनें एक दीर्घ सुस्कारा टाकला. पण क्षणा दोन क्षणांतच तिच्या विचारांना पुन्हां उलट गति मिळाली. ती मनांत म्हणाली, ' पण मी यांचा त्याग करून मधेंच गेलें, तर माझ्या मैत्रिणींचा विश्वासघात केल्यासारखं नाहीं का होणार ' मीच कायती त्यांच्यामधें कर्ती पुढारीण. मीच असा अवसानघात केल्यावर त्यांची अवस्था काय होईल? आमचे महाराज फारच पुढं गेलेले असले तरी त्या दोघींचे पति 'सन्धि नसल्यामुळं' अजून बरेच मागं आहेत. आपल्या संसाराबद्दल फारशी आशा नाहीं. पण त्यांचे खास सुधारतील. आपला संसार मोडला असला, तरी जातां जातां त्या दोघींचा संसार जुळविला, तर तेवढंच पुण्य लागणार नाहीं का?—नी आमच्यांना तरी मोकळं कां सोडा? त्यांना शासन करण्याचा मला कांहींच अधिकार नाहीं कां? मी इथून गेलें तर त्यांचं ऐतंच बरं होईल. खुश्शाल त्या छबूला घेऊन मिठ्या मारीत बसतील!—नाहीं, त्यांना शासन करण्याचा मला पूर्ण अधिकार आहे! अबलांचा पाठीराखा या जगांत कोणींच नाहीं! पतीच्या असल्या दुष्कृत्यांना समाज आड येत नाहीं; कायदा विघ्न करीत नाहीं; धर्म दरडावीत नाहीं; अशा स्थितींत स्वतःच्या कल्याणाचे अधिकार स्वतः स्त्रीनंच आपल्या हातांत घेतले, तर काय बिघडलं!

तें कांहीं नाहीं, आगाऊ ठरल्याप्रमाणं फौजदारांकडून यांची फटफजिती करून खोड मोडायचीच! सुधारले, तर बरं झालं; नाहीं तर आहेच आपलं त्यागव्रत!—पण भ्रष्ट झालेल्या, उष्टावलेल्या आपल्या पतीशीं सम्बन्ध कसा ठेवायचा? पतित झालेली पत्नी जर जन्माची त्याज्य, तर पतीलाही तो न्याय कां नसावा?—पण छेः, पुरुषसमाजानं असलं अन्यायाचं व्रत चालविलं, म्हणजे स्त्रियांनींही तसंच चालवावं काय? एकानं गाय मारली, तर दुसऱ्यानं वासरूं मारण्यासारखाच हा प्रकार! कोणतीही व्यक्ति असो, ती पश्चात्तापानं शुद्ध झालीच पाहिजे, नी समाजानंही ती तशी मानली पाहिजे! माझे पति पश्चात्तापदग्ध झाले, तर त्यांचा पुनर्जन्मच झाला, असं मला वाटेल नी ते मला पूर्वींइतकेच पवित्र वाटतील! सोनं घाणींत पडलं म्हणून कोणी टाकून का देतं? पाण्यांत धुवावं, आगींत तापवावं, पण शुद्ध करून घ्यावं, असाच व्यवहार आहे ना? तसंच हें!'

आतां मात्र तिचा विचार पक्का ठरला आणि यांत आतां बदल करायचा नाहीं, असें तिनें ठरविलें. याप्रमाणें तिची विचारमालिका थाम्बते न थाम्बते, तोंच सर्वोत्तम तिच्याजवळ येऊन थडकला.

त्याला पाहतांच आपल्या साऱ्या भावना दडपून व आपली खरी मनःस्थिति दडवून- तो थोडासा धुन्दींतच होता, तरी ही—त्याच्या गळ्याला मिठी मारून, ती त्याला प्रेमळ स्वरानें म्हणाली, 'कुठं बरं इतकी रात्र गेला होतां? इकडे आपल्या विरहानं माझी अवस्था काय होतेय्, त्याची नाहीं का आपल्याला कल्पना?'

तिच्या गुलाबी गालावर एक प्रेममुद्रिका उठवून सर्वोत्तमही प्रेमळ स्वरांत म्हणाला, 'अरेरे! खरंच, या माझ्या नाजुक प्रिय पांखराची काय ही अवस्था झाली! मला तुला एक क्षणही सोडून जाऊं नये, असं वाटतं, पण रोज नाहीं नाहीं त्या भानगडी उत्पन्न होतात न् हें असं निरुपायानं वागावं लागतं, त्याला मी तरी काय करूं?'

आपला पति आपल्याप्रमाणेंच आपल्याशीं हें प्रेमाचें नाटक करीत

आहे कीं, खऱ्या अन्तःकरणानें बोलत आहे, याचा थांग काढण्याकरितां ती त्याच्या मुखाकडे शोधक नजरेनें पाहूं लागली, तेव्हां हे बोल अगदीं अन्तःकरणांपासून निघालेले खरेखरे आहेत, असें तिला दिसून आलें.

—आणि वस्तुस्थिति तशीच होती!

सर्वोत्तम मोहनमन्दिरांत गेला कीं, त्याला छबूची भुरळ पडे; पण घरांत आला कीं, सुरेखा त्याचें अन्तःकरण काबीज करी. अजून तरी त्याचें मन जिंकण्यांत दोघी तुल्यबल होत्या—कांकणभर सुरेखाच अधिक म्हटलें तरी चालेल! आणखी कांहीं प्रेमाची भाषा झाल्यानन्तर तें युग्म निद्रेच्या स्वाधीन झालें. परन्तु आज सर्वोत्तमाला स्पर्श करतांना सुरेखेला कसें तरी वाटत होतें, एवढें खरं!

सुरेखेप्रमाणेंच जयश्री व चित्रा यांच्याही मनांत नानाप्रकारच्या विचारांनीं गोन्धळ उडवून दिला होता. पण ठरविलेल्या मार्गापेक्षां दुसरीकडे पाऊल टाकायचें नाहीं आणि आपल्या नेत्रीला गोत्यांत आणायचें नाहीं, असा त्यांचा निश्चय झाला असल्यामुळें त्या दोघीही आपल्या पतीशीं पूर्वीप्रमाणेंच पूर्णपणें प्रेमानें वागल्या.

हल्लीं जगदीश आणि श्रीनिवास या दोघांच्या मनांत एका निराळ्याच विषयाचें वादळ उत्पन्न झालें होतें. छबू आपणा दोघांशीं आदरानें वागते, पण प्रेमानें वागत नाहीं, हें त्यांच्या पूर्णपणें लक्ष्यांत आलें होतें. आपणाशीं वागतांना आणि सर्वोत्तमाशीं वागतांना तिच्या वागण्यांत किती अंतर पडतें तेंही त्यांच्या ध्यानांत आलें होतें. आणि तें तिचें वागणें त्यांच्या अंतःकरणांत शल्याप्रमाणें खुपत होतें. आतां यापुढें मोहनमन्दिरांत जावें का न जावें, असा त्यांच्यांपुढें प्रश्न पडला होता. पण तिथल्या अन्य विषयांची जबरदस्त मोहिनी त्यांच्या मनावर असल्यामुळें त्यांना मन्दिरावर बहिष्कार घालण्याचें धैर्य होत नव्हतें.

गम्मत अशी कीं, छबूच्या वर्तनाचा प्रश्न दोघांच्याही मनांत थैमान घालीत होता. तरी पण त्यांनीं अद्यापपर्यन्त एकमेकांजवळ त्याचा

उहापोह केला नव्हता; नव्हे त्याबद्दलचा थांग सुद्धां लागूं दिला नव्हता. पण सर्वोत्तमाची आणि छबूची एकान्ती 'वचनावचनी' झाल्या रात्रीं छबूच्या वर्तनांत विलक्षणच भेदभाव दिसून आल्यामुळें, हे दोघेही अन्तः-करणांत छिन्नविच्छिन्न झाले होते.

दुसऱ्या दिवशीं जगदीशाला राहवेनाच. आपल्या पोटांतली खळमळ केव्हां एकदा श्रीनिवासाजवळ ओकून टाकीन असें त्याला झालें. तशी त्याची भेट होतांच तो त्याला म्हणाला, 'श्री! अलीकडे तुला छबूच्या वर्तनांत फरक दिसतो का रे?'

'अलबत दिसतो!' श्रीनिवास म्हणाला, 'मी तुलाही हेंच विचा-रणार होतों. आरम्भी कांहीं असा प्रकार नव्हता!'

'आरम्भीं ती सर्वांकडे सारख्याच भावनेनं पाहत होती. पण आतां तिला भेदभाव करण्याचं कारण काय? आपण स्वरूपानं न् वयानं तर सारखेच आहोंत!'

'पण सम्पत्तीनं कुठें आहोंत?' श्रीनिवास म्हणाला, 'सर्वोत्तम लक्षाधीश आहे, हें लक्ष्यांत घे! आपल्याकडे कुठाय् तसं वैभव? कुठा-यृत हिऱ्या मोत्यांचे दागिने? कुठाय् मोटार? बाबा! हा पैसा कुणाला काय करायला लावील, याचा नियम नाहीं बरं! मी पूर्ण ओळखलंय्; ती छटेल छानछबेली हल्लीं सर्वोत्तमाशीं प्रेमाचे रंगढंग करूं लागलीय्! पण हें तिचं प्रेम सर्वोत्तमावरचं नव्हे; त्याच्या पैशावरचं आहे, समजलास? उद्यां एखादी लॉटरी मिळून आम्ही लक्षाधीश झालों कीं, लागलीच ती प्रेमाच्या जिभळ्या चाटीत आमच्याही पायाशीं आल्यावांचून राहणार नाहीं! पतीजवळ पैसा असेल, तर पत्नी त्याच्याशीं प्रेमानं वागते. पुत्र मिळवता असेल, तरच त्याचा पित्याजवळ मान असतो. इतकं कशाला? आपली पूज्य, प्रेमळ माता, तिला तरी आपली सारीं पोरं सारखींच, वाटलीं पाहिजेत ना? पण नाहीं; जो मुलगा कर्तासवर्ता, मिळविता असेल, त्याच्याकडे ती अधिक कौतुकानं, अधिक प्रेमानं, अधिक जिव्हाळ्यानं पाहते. इतर पोरं कांहीं तिला शत्रु वाटत नाहींत. पण त्यापेक्षां त्यांच्यांवर

तिचं लक्ष्य एकन्दरींत कमीच. प्रत्यक्ष आईची ही स्थिति! मग छबू तर काय बोलून चालून पैशाच्या पिण्डावर नजर ठेवून शृंगाराच्या आकाशांत भिरभिरणारी घार! जिथं तो पिण्ड दिसेल, तिथं ती झडप मारणारच! छबूच्या मोहांत आपण तिघेही सांपडलों होतों, ही गोष्ट नक्की. आपणा तिघांवरही तिनं मेहरबानी केली असती तरी हरकत नव्हती. बोलून चालून वेश्येचंच मॉडेल तें! परन्तु तिनं आम्हा तिघांना डावलून केवळ सर्वोत्तमाच्याच गळ्यांत पडायला नको होतं; आणि जिवलग मित्र म्हणविणाऱ्या सर्वोत्तमानंही एकट्यानंच हा शृंगारिक मेवा लुटायला नको होता! हा आमच्याशीं त्यानं निव्वळ विश्वासघात केलाय्!—'

'अरे बाबा! कनक आणि कामिनी यांच्यापुढं कसला मित्र न् कसलं काय घेऊन बसलास? या जोडीपुढं एखादा धर्मराजसुद्धां लटपटायचा; मग सर्वोत्तम कोणत्या झाडाचा पाला?' जगदीश म्हणाला.

'तूं कांहीं म्हण, पण—' श्रीनिवास हळूच घोगऱ्या आवाजानें म्हणाला, 'हें पांखरूं सर्वोत्तमाला कांहीं पचूं देतां उपयोगी नाहीं! एवीतेवीं हें आमच्या हातांतनं निसटलं आहेच, तर आतां सर्वोत्तमाच्याही हातांतून निसटूं द्या! आम्हा दोघांना तडफडत ठेवून एकट्या सर्वोत्तमालाच मजा मारण्याचा काय अधिकार आहे? छबू हातांतनं निसटल्यामुळं सर्वोत्तम धडपडला, चडफडला, तळमळला, तर आम्हा दोघांना खचित आनन्द होईल!'

'पण हें शक्य आहे का?' जगदीश निराशेनें म्हणाला, 'सर्वोत्तमावर त्या मोहक, मंजुळ, मैनेची मोहनी पुरती बसलीय्. त्यांतून त्याला दूर करायचं कसं? फारच कठिण काम आहे हें!'

'त्याच्या बायकोला सोडूं या का त्याच्यावर? वाघिणीसारखी झडप घालून त्याच्या नरडीचा घोंटच घेईल ती!' श्रीनिवास म्हणाला.

'नको नको! हा उपाय म्हणजे दुधारी शस्त्रच तें! त्याचीं बोटं कापतील, पण आमचींही छाटलीं जातील! आमचीं तरी काय कमी कुळं-

गडीं आहेत? सारीं बाहेर पडलीं म्हणजे पंचाईत!' जगदीश म्हणाला.

'आमचे शालू गेले, मोत्यांच्या बांगड्या गेल्या अन् किती तरी आमची आर्थिक न् मानसिक नुकसानी झाली, ती आतां कुणाला विचारायची? तिला आमच्यांवर प्रेम करायचं नव्हतं, तर तिनं आमच्या वस्तूंचा स्वीकार कां केला?'

'बोलून चालून वस्तु लुबाडायला बसलेली बाजारबसवीच ती! तिच्याकडे काय दोष आहे? तिच्यावर बक्षीसांचा वर्षाव करतांना आम्हीच विचार करायला पाहिजे होता!' जगदीश म्हणाला.

'मला वाटतं सर्वोत्तमाशीं एकदां सडकून भाण्डण तरी करावं!'

'त्याचा काय उपयोग होणार?'

'त्यानं केलेला विश्वासघात त्याच्या नजरेला आणला, तर तो थोडासा तरी शुद्धीवर येईल!'

'हें सुद्धां अशक्य आहे! मदिराक्षीच्या मोहांत सांपडल्यावर माणसाला जगच दिसत नाहीं. तिथं आम्ही दोघे कसे दिसणार? आणि छबूच्यापुढं त्याला आमची पर्वा काय वाटणार? आम्ही भाण्डलों तर तो भाषण बन्द करून आमच्याशीं कायमचा सम्बन्ध तोडील! तो श्रीमन्त असल्यामुळं आमच्यावांचून त्याचं काय नडणार आहे अन् पैसा असल्यावर मित्रांना तरी काय तोटा?—'

याप्रमाणें त्या दोघांनीं याच विषयावर आणखी पुष्कळ वाटाघाटी केल्या, परन्तु निश्चित असें कांहींच ठरलें नाहीं.

आमच्या नव्या युगांतील 'नव्या पतिव्रतां'नीं मात्र ठरल्याप्रमाणं गुप्तपणें रा. सा. भीमरावांची गांठ घेतली आणि 'चक्षुर्वै सत्यम्' या म्हणीप्रमाणें प्रत्यक्ष पाहिलेल्या साऱ्या प्रकाराचें इतिवृत्त त्यांच्या कानावर घातलें. तेव्हां तिघींच्या अजब धाडसाचें त्यांना कौतुक वाटून, त्यांच्या मुखावर स्मित चमकूं लागलें आणि ते आनन्दानें म्हणाले, 'शाबास!

हुषार मुलींनों! शाबास! तुमच्या या कर्तबगारीवर मीं बहोत खूष आहे! आतां तुमच्याबद्दल माझी खात्रीच पटली! माझाही माणूस त्यावेळीं त्या जुगाऱ्यांत होता. त्यानंही मला सारा रिपोर्ट दिलाच आहे!—अर्थात् एकान्ताला सोडून! आतां यापुढं कसं कसं वागायचं, तें मीही नक्की ठरवून ठेवलंय्. आतां माझ्या साऱ्या कल्पना तुम्हांला सांगतों. त्या तुम्हांला पटतात का पहा. वाटेल तर वाटाघाट करून त्यांत दुरुस्ती करूं आणि ठरल्याप्रमाणं बार उडवून टाकूं!' असें म्हणून रावसाहेबांनीं आपल्या साऱ्या कल्पना समजावून सांगितल्या आणि मौज अशी कीं, त्या साऱ्या त्या महिलांना पटल्या.

त्यानन्तर प्रफुल्लित अन्तःकरणानें हास्यविनोद करीतच तें त्रिकूट आपल्या घरीं रवाना झालें, हें सांगणें नकोच!

---

# : १४ : डोळ्यापुढें अन्धाऱ्या आल्या

मागील गोष्टी झाल्यानन्तर दोन तीन दिवसांनीं योग्यशी सन्धि साधून सुरेखेनें हॉटेलमधल्या आपल्या रूममधें त्रिविक्रमपन्तांना बोलाविलें आणि ती त्यांना हलक्या स्वरांत म्हणाली, ' पन्त, मी तुम्हाला एका महत्वाच्या कामाकरितां बोलावलंय्, तें या माझ्या मैत्रिणींना सुद्धां कबूलाय् !'

' सांगा ना काय तें. मी ऐकायला तयार आहें.' पन्त म्हणाले.

' पण तुम्ही हंसाल, आमची चेष्टा कराल !' सुरेखा म्हणाली.

' छेः छेः मला पटलं तर मी कबूल करीन; नाहीं तर गम्भीरपणें स्वस्थ बसेन. तुम्ही माझं गिऱ्हाईक आहांत. गिऱ्हाईकाशीं कसं वागायचं, याचा मी सशास्त्र अभ्यास केलाय् ! सांगा, बेशक सांगा तुम्ही !' अधीर झालेले पन्त बाह्यतः शान्तपणानें व निर्विकार स्वरानें म्हणाले.

' आम्ही मुद्दाम तुमच्या दिवाणखान्यांत काय चालतं तें गुप्तपणें पाह्यलं !'

' काय ? तुम्हाला ते सारे प्रकार दिसले ?' थोडेसें घाबरून पन्त म्हणाले. पुढें मागें ते त्यांना त्या गोन्धळांत ओढणार होतेच. पण सध्याच ते प्रकार त्यांना दिसायला नको होते, असें त्यांना वाटलें इतकेंच.

' कां, पन्त, भ्याल्यासारखे झाला तुम्ही ? अहो, त्यांत भिण्यासारखं काय आहे ? आम्हांला आवडलेत ते सारे प्रकार !'

' काय म्हणतां तुम्हांला आवडले ?'

' हो हो, मलाच काय, पण माझ्या मैत्रिणींना सुद्धां आवडले !'

' आश्चर्य आहे !'

' आश्चर्य वाटण्याचं कारण काय, पन्त ? मनं, भावना नी विकार परमेश्वरानं फक्त पुरुषांनाच दिलेत का ? पन्त, पुरुषांना जशी निरनिराळ्या प्रकारानं मौज करावीशी वाटते, तशी स्त्रियांना वाटत नाहीं

का ? खचित् वाटते ! पण दुर्दम लाज, कठोर समाज, नी दुर्लौकिकाची भीति यामुळं स्त्रिया आंतल्या आंत अन्यायानं दडपल्या जातात इतकंच ! आतां पुरुष व्यसनं करतात, म्हणून बायकांनींही तीं करावींत, किंवा ते लग्नाच्या बायकांशीं बेइमान होऊन बाहेरख्याली होतात, म्हणून बायकांनीं सुद्धां मनाची मौज करण्याकरितां पुरुषांना फसवून बाहेर छिनाल बनावं, असं माझं म्हणणं नाहीं ! आतां उदाहरणच पहा—स्पष्ट बोलतें, त्याची क्षमा करा हं !—अपरात्रीं तुमच्या दिवाणखान्यांत ब्रिझिकचा डाव चालतो, खाणंपिणं चालतं, दारू चालते नी जुगारही चालतो. आतां आम्ही स्त्रियांनीं सुद्धां त्या मण्डळींत मिसळून खाणंपिणं करायला, ब्रिझिकचा डाव खेळायला नी केव्हां तरी जुगार खेळायला काय हरकत आहे ? पण आम्ही दारूला मात्र हातही लावणार नाहीं. पण तिला वगळून बाकीचे फायदे दवडण्यांत काय अर्थ आहे ?'

'काय ? तुम्ही त्या मण्डळींत येऊन बसाल ?'

'हो, अवश्य !'

'माझी हरकत नाहीं—' मनांत अतिशय हरकून, पण वरून गम्भीरपणें पन्त म्हणाले, 'पण मला वाटतं अचकट विचकट बोलणाऱ्या त्या दारुड्या मण्डळींत तुमच्यासारख्या सभ्य, कुलीन स्त्रियांनीं न यावं हें बरं ! आतां माझी बायको तिथं येते, पण केवळ 'कर्तव्य' म्हणून ती किती कष्टानं येते, तें मला–तिला किंवा परमेश्वरालाच माहीत !'

'पन्त !' सुरेखा निश्चयानें म्हणाली, 'तुमच्या भीतींत अगदींच तथ्य नाहीं, असं नाहीं. परन्तु आमची खात्री आहे कीं, तुमच्या मण्डळींत जर आम्ही तिघी कुलीन स्त्रिया आलों, तर खचित त्यांच्या शिवराळपणाला पायबन्द बसून त्यांचें मद्यपानही मित होईल नी एकप्रकारें त्यांना सुधारल्याचं आम्हांला श्रेय मिळेल. जुगाराला सुद्धां आम्ही थोडासा आळा घालूं !'

पन्त मनांत म्हणाले, 'तुम्ही कसला जुगाराला आळा घालतां ? एकदा तुम्ही त्या चक्रांत सांपडलां कीं, प्रत्येक बाबतींत तुम्ही पुरुषांवर ताण केल्याशिवाय राहणार नाहीं ! स्त्रिया अब्रूच्या नी लाजेच्या पिंजऱ्यांत

असतात, तोंपर्यन्त त्या मर्यादेंत असतात. पण त्या एकदां का पिंजऱ्यां-तून मोकळ्या सुटल्या कीं, त्यांना आवरायला पार्थसारथी गोपालकृष्ण-सुद्धां पुरा पडणार नाहीं!' पण हे सारे विचार मनांतच ठेवून ते चिन्ता-युक्त चेहऱ्यानें म्हणाले, 'तुम्ही या गांवच्या; ते लोकही याच गांवचे. तुमची त्यांची प्रत्यक्ष ओळख असणार. तुमची नसली तरी तुमच्या 'माणसां'ची न् त्यांची तरी असणार. अन् याचा बोभाटा—'

'त्याची काळजी तुम्ही सोडा!' सुरेखा म्हणाली, 'तुमच्या दिवाणखान्यांत जी मण्डळी जमतात, त्यापैकीं एकही इसम आमच्या ओळखीचा नाहीं नी आम्ही कोण आहोंत हें त्यांना माहीत नाहीं! आमचा सहवास त्या मण्डळींना खात्रीनं आवडेल. कोणी भगिनीच्या नात्यानं आमच्याकडे पाहतील; कोणी पापदृष्टीनंही पाहतील. पण आमच्या सहवासांत विघ्न येऊं नये म्हणून त्यांपैकीं कोणीही आमची उपस्थिति आमच्या पतींना कळविणार नाहीं. कारण दोन्ही प्रकारच्या मण्डळींना आम्ही हव्या असणार. अन् त्यांतूनही आमचे पति बिथरले तर त्यांना ताळ्यावर आणायला आम्ही पूर्ण समर्थ आहोंत. आम्ही थोड्या स्वतन्त्र वृत्तीच्या आहोंत खऱ्या, पण आमच्या शीलाबद्दल आमच्या पतींची पूर्ण खात्री आहे. त्यामुळं त्यांना कोणी कांहीं सांगितलं, तरी तें त्यांना खरंच वाट-णार नाहीं!—अन् सध्यां तर ते प्रवासांतच आहेत. ते येईपर्यन्त तरी ही गम्मत करायला काय हरकत आहे?—बरं तसं वाटलंच तर तुमच्या मैफलींतली आमची हजेरी रद्द करून टाकूं; आहे काय त्यांत?'

आतां मात्र पन्तांना पूर्ण समाधान झालें. आपल्या कल्पनेप्रमाणें साऱ्या गोष्टी घडून येत आहेत, असें दिसून येतांच ते आतां पुरते खुषींत आले. पाय घसरत अखेरीस या नकली पतिव्रता छिनाल बनणार आणि आपली छबू सर्वोत्तमाच्या मोहांतून सुटणार, याबद्दल त्यांना आतां शंकाच राहिली नाहीं. ते म्हणाले, 'सुषमाताई, तुम्ही माझ्या साऱ्या शंकांचं समाधान केलंत, याबद्दल मला अतिशय आनन्द झालाय्! आमच्या पोटापुरतं आम्हांला कांहीं कमी नाहीं. आम्ही दोघं कुठंही जरी स्वस्थ बसलों, तरी मीठभाकरी आम्हाला मिळेल, इतकी आम्ही व्यवस्था करून

ठेवलीय्! आतां ही ‘ संस्था ’ स्थापलीय् म्हणजे काय ? चार सभ्य गृहस्थ एकत्र यावेत अन् त्यांनीं तास दोन तास मौज करावी एवढ्याचकरितां! त्यांत तुमच्यासारख्या स्त्रियांच्यामुळं विघ्न येऊं नये, एवढीच इच्छा, दुसरं काय ?’

‘ छेः, त्याबद्दल तुम्ही मुळींच फिकीर करूं नका!’ असें म्हणून सुरेखेनें हांसत, अशा एका मोहक तऱ्हेनें पन्तांच्याकडे पाहिलें कीं, तेवढ्या-नेंच ‘ या छटेल तरुणींत कांहीं तरी पाणी मुरतंय् ’ असा त्यांनीं खात्रीचा कयास बान्धला.

यानन्तर त्या तिघींनीं रात्रीच्या मैफलींत केव्हां प्रवेश करायचा, तो दिवस नक्की ठरविण्यांत आला. पन्त आनन्दून व त्यांचा निरोप घेऊन निघून गेले व आमच्या ‘ पतिव्रतां ’ नीं रावसाहेबांची गांठ घेऊन पुढील योजना निश्चित केल्या.

तो ठरलेला दिवस उगवला.

त्या रात्रीं रोजचे सर्व सभासद जमल्यावर त्रिविक्रमपन्तांनीं प्रस्ताव केला, ‘ मित्रहो! आज तुमच्या कानावर एक आनन्दाची बातमी घालायचीय्!–’

‘ कोणती ? कोणती ?’ सर्वांनीं एकच गिल्ला केला.

‘ थाम्बा! गडबड करूं नका!’ पन्त हांसत म्हणाले, ‘ ती अमृत-मय वार्ता ऐकण्याकरितां आपले कान टवकारून तयार व्हा!’

‘ उभारलेत आम्ही आमचे कान!’ सर्वोत्तम म्हणाला, ‘ तुमची बातमी कीं, वार्ता कीं, काय तें आधीं सांगा!’

‘ मित्रहो! आतांपर्यन्त आम्हा सर्व पुरुषमण्डळींत एकच स्त्रीरत्न चमकत होतं; पण आतां याच्यापुढं आणखी दोन तीन स्त्रीरत्नं आपल्या बैठकींत झळकण्याचा सुयोग आलाय्!’

‘काय म्हणतां ?’ श्रीनिवास आश्चर्यानें म्हणाला.

‘ तुमची शपथ!’ पन्त गम्भीरपणें म्हणाले, ‘ आणि गम्मत अशी कीं, आमचीं सर्व प्रकरणं त्यांना कबूल आहेत–नव्हे त्यांत भाग घेण्याची सुद्धां त्यांची इच्छा आहे!—अशा रसिक महिला आहेत त्या!’

'कुलीन आहेत कीं, मलीन आहेत?' जगदीशानें विचारलें, 'जर मलीन असतील, तर मात्र त्यांच्या येण्यासम्बन्धानं आम्हांला विचार करावा लागेल!'

'छेः छेः हो, चांगल्या कुलीन, घरंदाजांच्या आहेत, श्रीमन्त आहेत! त्यांच्यांत जी मुख्य आहे, तिचं काय बरं नांव? सुषमा सुन्दर-राव शृंगारपुरकर. दुसऱ्या दोघींचीं 'चपला' न् 'अमला' अशीं नांवं आहेत. तेव्हां त्या आपल्या मण्डळींत दाखल झाल्यावर, मित्रहो, त्या रसिक विदुषींचा तुम्ही सत्कार कराल, आणि त्यांना योग्य असा त्यांचा गौरव कराल, अशी आशा आहे!'

श्रीनिवास उठून आनन्दानें म्हणाला, 'पन्तांच्या इच्छेप्रमाणं आम्ही त्या त्या विदुषींचं, त्यांच्या उपस्थितीबद्दल अवश्य अभिनन्दन करूं! स्त्रिया म्हणजे मूर्तिमन्त आनन्द, मूर्तिमन्त स्फूर्ति न् मूर्तिमन्त शोभा आहेत! स्त्रियांच्यामुळं स्वर्ग निर्माण होतो; स्त्रियांच्यामुळं महा-काव्यं तयार होतात; स्त्रियांमुळं वीरांनीं महायुद्धं जिंकलीं आहेत, आणि कोणत्याही समारम्भाला स्त्रियांवांचून रमणीयत्व येत नाहीं! सभोंवतीं तारकारत्नं चमकताहेत, म्हणूनच चन्द्राला शोभा आहे!' याप्रमाणें भाषण करून श्रीनिवास खाली बसतांच, सर्वांनीं टाळयांचा गजर करून त्याच्या विचारांना मान्यता दिली.

नन्तर जगदीश उठला.

'मित्रहो! त्यानें आपल्या व्याख्यानाला आरंभ केला, 'पुरुषसमा-जांत मिसळून त्याच्याशीं हास्यविनोद करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगण्याचं धाडस करणाऱ्या ललनांचं कौतुक करावं तेवढं थोडंच आहे! आतांपर्यंत लाज, भीड न् मर्यादा या कृत्रिम भावनांच्या त्रिकोणांत आमचा स्त्री-समाज सांपडून राष्ट्रीय दृष्टीनं अगदीं कुचकामाचा बनून गेलाय्; देशाच्या दृष्टीनं त्याचा कांहीं उपयोग नाहीं; बेचव स्वयपाक अन् मरतुकडी प्रजा, यांच्या उत्पत्तीशिवाय त्याला कांहीं महत्त्वाची कामगिरीच नाहीं; पण ती कोण्डी फोडून या धीट स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनं प्रत्येक गोष्ट करूं इच्छित आहेत, याबद्दल आम्हाला अत्यंत आनन्द होत आहे!' इतर्के

वक्तृत्व गाजवून तो बसतांच, टाळ्या वाजवून मण्डळींनीं त्याचेही विचार मान्य केले.

यानन्तर साहजिकच सर्वोत्तमाची पाळी आली.

सर्वोत्तमानें आपल्या भाषणास सुरवात केली, 'मित्रहो ! तुम्ही सर्वांनीं त्या कुलीन न् रंगेल–चांगल्या अर्थानं हा शब्द मी वापरलाय्–रमणींच्या आगमनाला जी आनन्दानं अनुमति दिलीत, तिलाच मी अभिनन्दनपूर्वक हार्दिक पाठिम्बा देत आहे !–बरं, पन्त, त्या केव्हां येणार आहेत !'

'तुमचे रोजचे कार्यक्रम सुरू होऊंद्यात.' पन्त म्हणाले, 'आणखी दोन अडीच तास तरी लागतील त्यांना यायला !'

'हरकत नाहीं !' सर्वोत्तमानें आपलें भाषग पुढें चालविलें, 'सकाळचे सहा वाजले, तरी त्याची पर्वा नाहीं. तिथपर्यन्त सुद्धां आम्ही बसायला तयार आहोंत ! ज्या राष्ट्रांत स्त्रियांचा सादर गौरव होतो, तेंच राष्ट्र मान्यतेला चढून त्याचा जयजयकार होतो ! हिन्दुस्थानानं सुद्धां आतां या गोष्टी शिकल्या पाह्यजेत !' इतकें बोलून तो खालीं बसला आणि मण्डळींनीं टाळ्यांचा नुसता मुसळधार पाऊस पाडला.

आपल्या मण्डळींत त्या स्त्रिया येणार ही बातमी कळतांच श्रीनिवास व जगदीश यांना अगदीं मनापासून आनन्द झाला होता. त्यांतल्या दोघींनीं त्यांच्यावर जर मेहरनजर केली, तर छबू सर्वोत्तमावर आषक झाल्याबद्दलची त्यांना तक्रार करायची नव्हती. फक्त त्यांची एवढीच इच्छा होती कीं, स्त्रियांपैकीं कोणी तरी आपल्यावर आषक व्हावें आणि त्या स्त्रियांपैकीं दोघी तरी आपल्यावर मेहरबानी करतील, अशी त्यांना अन्धुक आशाही उत्पन्न झाली होती. नन्तर श्रीनिवास म्हणाला, 'त्या येणाऱ्या स्त्रिया कशाही असल्या तरी आम्हाला पूज्यच आहेत तरी पण त्यांच्या रंगरूपाची थोडीशी माहिती आम्हांला कळेल तर बरं होईल !'

'अप्सरेसारख्या सुन्दर न् ऐन तरुण आहेत त्या !' पंतांनीं तावडतोब खुलासा केला. त्याबरोबर एकेक सभासद केवळ कल्पनेनें आपल्या मनःफलकावर त्या रमणींचीं रम्य चित्रें रेखाटूं लागला आणि तीं तयार

होतांच, प्रत्येकाला वाटूं लागलें कीं, आपण इंद्राच्या दरबारांतच बसलों आहोत. आतां मात्र त्या अप्सरांना पाहण्याविषयीं जो तो अतिशय अधीर झाला होता.

वास्तविक सुरेखा वगैरे तिघीजणी या वेळीं आपल्या खोलींत बसून त्यांचीं भाषणें ऐकत होत्या. पण 'बैठक रंगांत आल्यावांचून आम्ही प्रवेश करणार नाहीं.' असें त्यांनीं पन्तांना सांगितलें होतें आणि म्हणूनच त्यांनीं तो तसा खुलासा केला होता.

सर्वोत्तमाला त्या स्त्रिया बैठकींत येणार, याबद्दल आनंदही झाला नाहीं आणि विषादही वाटला नाहीं. केवळ तो तटस्थ होता. फक्त त्या धाडसी स्त्रियांबद्दल त्याला कौतुक मात्र वाटत होतें. परन्तु छबूची मनःस्थिति मात्र तशी नव्हती. त्या स्त्रियांनीं त्या बैठकींत येणें, हें तिला वावडें वाटत होतें. म्हणून ती म्हणाली 'मण्डळींची परवानगी असेल तर मलाही त्याबद्दल चार शब्द बोलायचेत!'

'अवश्य अवश्य!' सर्वांनीं एकच गलबला केला.

छबूताई भाषण करण्याकरितां उठल्या.

त्याबरोबर त्याला हरकत करून सर्वोत्तम म्हणतो, 'सभ्यहो! भाषण करतांना उठण्याची पुरुषसमाजांत प्रथा आहे. पण त्याप्रमाणंच कोमल स्त्रियांनींही वागावं काय?'

'नाहीं नाहीं!' सर्व मण्डळी एकदम ओरडली, 'स्त्रियांनीं बसून व्याख्यान दिलं, तरी त्याला आमची हरकत नाहीं!–नाहीं, नाजुक प्रकृतीच्या स्त्रियांनीं बसूनच व्याख्यान दिलं पाहिजे!'

'छबूताई! बसून बोला तुम्ही' सर्वोत्तम तिच्याकडे पाहून, हांसत म्हणाला.

'नको, मी उभ्यानंच भाषण करतें!' छबू म्हणाली.

'तरी हरकत नाहीं' पन्त म्हणाले, 'स्त्रियांना दोन्ही तऱ्हेनं सवलत असावी!—हं, बोला तुम्हाला काय बोलायचं असेल तें!'

छबू म्हणाली 'मी आपल्याला एकदमच स्वच्छ सांगतें कीं, असल्या या आपल्या बैठकींत त्या स्त्रियांना येऊं देण्याला मी सर्वस्वी विरुद्ध आहे!

तिचें हें मत ऐकून सर्व बैठक एकदम चकित झाली आणि सर्वच जण एकमेकांत कुजबुजूं लागले. तेव्हां ती म्हणते, ' आपल्याला इतकं आश्चर्य वाटण्याचं मुळींच कारण नाहीं. त्या स्त्रियांच्याबद्दल मला पूर्ण आदर आहे. त्यांना मी प्रत्यक्ष पाह्यलं आहे. त्या अतिशय सुन्दर, तरुण नी विदुषी आहेत, यांत मुळींच शंका नाहीं. त्यांच्याबद्दल मला मत्सर बिलकूल वाटत नाहीं. इतकं सारं कबूल करूनही मी पुन्हां आपल्याला सांगतें कीं, मी सर्वस्वी त्यांच्या प्रवेशाविरुद्ध आहे ! '

' कारण सांगाल तर आमच्यावर मेहेरबानी होईल ! ' श्रीनिवास मधेंच म्हणाला.

' अधीर होऊं नका. सांगतें. ' छत्रु हांसत हांसत म्हणाली, ' त्या स्त्रिया तरुण आहेत, सुन्दर आहेत, पण त्यापेक्षां परतन्त्र आहेत !—'

' म्हणजे ? ' जगदीशानें मधेंच विचारलें.

' परतन्त्र आहेत म्हणजे त्यांचे पति आहेत ! त्यांना न विचारतां त्या भोळ्याभाबड्या धाडसी स्त्रिया आपल्या या असल्या बैठकींत येताहेत याचा आपण दूरवर विचार केलांत काय ? मी स्पष्ट बोलतें त्याची क्षमा करा ! या स्त्रियांच्या पायांत भाण्डणं होतील, घरंदारं धुळीला मिळतील, आमच्या या हॉटेलाचा विध्वंस होईल, नी कुणाला दण्ड होतील तर कुणाला तुरुंगाचीही हवा खायला मिळेल ! या सर्व गोष्टींचा नीट विचार करा नी मग त्यांच्या प्रवेशाला अनुमति द्या ! शिवाय आमच्या सर्वनाशाबरोबर त्याही बिचाऱ्यांचा सर्वनाश होण्याचा सम्भव आहे, याचाही आपण अवश्य विचार करावा ! ' असें म्हणून ती खालीं बसली.

या नन्तर जगदीश व श्रीनिवास यांनीं भाषणें करून छत्रूचे मुद्दे खोडण्याचा प्रयत्न केला. पन्तांनींही त्यांना दुजोरा दिला.

त्यांचीं भाषणें चालू असतांना सर्वोत्तम छत्रूच्या कानांत हळूच म्हणाला, ' तूं त्या स्त्रियांच्या प्रवेशाला कां हरकत घेत आहेस, याचं कारण आलं लक्ष्यांत माझ्या ! त्या सुन्दर स्त्रिया इथं आल्या तर कदाचित माझं मन आकर्षण करून घेतील अन् तुझ्याकडे मी दुर्लक्ष्य करीन,

अशी तुला भीति वाटलीना? पण हा तुझा संशय फोल आहे. या जन्मांत तरी आतां दुसरी स्त्री मला भुलवूं शकणार नाहीं! माझें सर्वस्व तूंच—तूंच-तूंच आहेस समजलीस!—येऊंदेत त्या स्त्रिया. बिलकूल भिऊं नकोस तूं!

या सर्वोत्तमाच्या आश्वासनानें छबूला धीर आला आणि तिनें त्या स्त्रियांच्या प्रवेशाला आनन्दानें सम्मत्ति दिली.

योग्य वेळ होतांच दिवाणखान्याला लागून असलेलें, खोलीचें दार उघडलें व सिनेमा नटीसारख्या दिसणाऱ्या तीन स्त्रिया बैठकींत येऊन दाखल झाल्या. त्यांना पाहतांच दिपून सर्व सभ्यांनीं 'अहाहा!' असे आनन्दाचे उद्गार काढले, पण सर्वोत्तम, जगदीश व श्रीनिवास यांचे चेहरे मात्र काळेठिक्कर पडले आणि त्यांच्या डोळयापुढें अन्धाऱ्या येऊं लागल्या!!

---

## : १५ : नव्या पातिव्रतांचा पुण्यप्रभाव !

आपल्याला हा कांहीं तरी भास झाला असेल, अशा समजुतीनें त्या तिघांनीं आपले डोळे चोळले आणि पुन्हां एकदां त्या स्त्रियांकडे डोळे विस्फारित करून, नीटपणें निरखून पाहिलें. तेव्हां त्यांची पक्की खात्री झाली कीं, हा आपल्याला कांहीं तरी भास झाला नसून, खरोखरीच आपल्या सहचारिणी आपल्यासमोर आपल्या पापाचा झाडा घेण्याकरितां, इंगळासारखे ताम्बडे लाल डोळे करून उभ्या आहेत ! क्षणमात्र त्यांच्या हृदयाचा थरकांप झाला, पण लागलीच त्यांनीं धीर धरून आपआपल्या बायकांचीं नांवें घेऊन पुकारलें—

'कोण सुरेखा ?'

'कोण चित्रा ?'

'कोण जयश्री ?'

'होय ! होय ! होय !' तिघींनीं एकदम निर्भयपणें उत्तर दिलें.

'पन्त !' वीज कडकडावी त्याप्रमाणें कडकडाट करून सर्वोत्तम पत्नांला म्हणाला, 'तुम्ही आमची इतकी मस्तवालपणानं मस्करी कराल, अशी आमची कल्पना नव्हती ! तुम्ही आम्हांला काय समजलांत ? मनांत आणूं तर एका क्षणांत तुम्हाला नेस्तनाबूद करूं ! नुसता पाजीपणाचा कळस केलात ! हरामखोर ! नीच !'

सर्वोत्तमाच्या या सरबत्तीनें बिचारे पन्त अगदीं घाबरून गेले. ते थरथर कांपत, हात जोडून म्हणाले, 'भाऊसाहेब ! काय, झाला तरी काय आमच्याकडून अपराध ? तो कळेल तर त्याप्रमाणं मला पुढं वागायला बरं पडेल !'

'बोला, कुठाय् तुमची ती सुषमा शृंगारपुरकर ?'

'या पहा, या आमच्यासमोर उभ्या आहेत यच !'

'हरामजाद्या ! ही माझी बायको सुरेखा, समजलास ?'

'अन् ही माझी जयश्री !'

'अन् ही माझी चित्रा !'

'म्हणजे ?' आश्चर्यानें जवळजवळ वेडे होऊन पन्त त्यांच्याकडे आणि त्यांच्या पतीकडे टकमका पाहत म्हणाले, 'यांनीं मला पुरतंच बनवलं म्हणायचं तर !'

पन्तांच्याप्रमाणें इतरही विलक्षण आश्चर्यचकित झाले आणि याचें पर्यवसान काय होतें, याची कोणालाच कल्पना येईना. छबूताईच्या नजरेसमोर मात्र सारीं भविष्यत् चित्रें स्पष्टपणें उभीं राहिलीं. आपली आणि सर्वोत्तमाची कायमची ताटातूट होणार आणि पुन्हां या भर्जी तळणाऱ्याच्या गळ्यांत कायमचें पडावें लागणार, याबद्दल तर तिची पुरी खात्री झाली आणि तिचा चेहरा क्षणभरांत अगदीं उतरून गेला.

थोडासा धीर धरून पन्त म्हणाले, 'भाऊसाहेब ! या स्त्रियांना तुमच्यांसमोर आणण्यांत तुमचं मनोरंजन करण्याशिवाय आणि आपल्या बैठकीला गम्मत आणण्याशिवाय दुसरा कोणताही उद्देश नव्हता ! या तुमच्या बायका आहेत, हें जर मला आधीं समजलं असतं, तर यांना इथं आणून मी माझ्या पायांवर असा धोंडा पाडून घेतला नसता ! या इथं आल्यानं माझी किती नुकसानी झालीय्, याची तुम्हाला कल्पना नाहीं; पण मला ती पुरी असल्यामुळं, भाऊसाहेब, माझ्या अन्तःकरणांत भयंकर धरणीकम्पाचा धक्का बसलाय् बरं !' असें म्हणून त्यांनीं त्यांना थोडक्यांत सुरेखा वगैरे कशा आल्या, त्याची हकीकत सांगितली.

ती ऐकल्यानंतर सर्वोत्तम सुरेखेकडे वळून, जळजळीत नजरेनें तिच्याकडे पाहत तिला म्हणाला, 'सुरेखा ! तूं कां इथं आलीस ?'

'कां आलें ? तुम्ही आलांत म्हणून मी आलें ! तुमच्याकरितां मला इथं–या नरकपुरींत यावं लागलं ! माझी कल्पना होती, तुमच्यामध्यें थोडी तरी माणुसकी शिल्लक असेल अन् त्यामुळं लाजेची काळी कभिन्न छाया तुमच्या चेहऱ्यावर पसरेल; पण आतां तुम्ही पुरते बनलांत ! या हॉटेलच्या सडलेल्या, कुजक्या नासक्या खाद्यपदार्थांची तुम्हांला

किळस येत नाहीं; मद्यपानाबद्दल शरम वाटत नाहीं; जुगाराबद्दल लाज वाटत नाहीं; नी धडधडीत बाजारबसव्यांना आलिंगनं देऊन, त्यांचीं घाणेरडीं चुम्बनं घेतांहांत, पण त्याबद्दलही तुमचं मन तुम्हाला खात नाहीं! हे सारे प्रकार आम्हीं प्रत्यक्ष पाह्यलेत! तुमच्या पापाच्या या आम्हीं तीन साक्षीदारिणी इथं उभ्या असूनही तुमच्या माना खालीं होत नाहींत! उलट आपले चेहरे ताम्बडेलाल करून आम्हांलाच प्रश्न विचारतां, 'तुम्ही कां आलांत म्हणून?' हो, आम्हीं आलों आहोंत, तुम्ही तिघं किती विश्वासघातकी, किती कपटी, किती फसवे आहांत तें जगाला दाखविण्याकरितां आलों आहोंत!!—'

'आमची बेअब्रू तुम्ही जगभर करणार!!' सन्तापून सर्वोत्तमानें विचारलें.

'हो आम्ही करणार!' सुरेखाही तितक्याच खणखणीतपणें म्हणाली, 'तुमचा आमचा आतां काय सम्बन्ध? तुमचे हे पापाचार आम्ही ज्या क्षणीं प्रत्यक्ष पाह्यले, त्याक्षणींच आम्ही तिघींनीं तुमचा सम्बन्ध ताडकन तोडून टाकला! तुमची इस्टेट आम्हांला नको; तुमचा सहवास नको; तुमचं नांवसुद्धां आमच्या कानावर यायला नको; कुंकू हें 'आमचं' असल्यामुळं आम्ही तें कायम ठेवणार. मंगळसूत्र तुमचं आहे. हें घ्या आपल्याकडे!' असें म्हणून तिनें खरोखरीच तें काढून सर्वोत्तमाच्या अंगावर फेकलें. बाकीच्या दोघींनींही तिचेंच अनुकरण केलें. हें तिघींचें धाडस पाहतांच, त्या तिघांच्याही अन्तःकरणाचा थरकांप झाल्यावांचून राहिला नाहीं. पुढें सरेखा म्हणाली, 'आमचीं लग्नं झाल्यानन्तर तुम्ही आमचीं नावं बदललींत. तीं टाकून देऊन आम्ही पुन्हां आपलीं माहेरचीं नांवं नी आडनांवं वापरणार!'

'पण आम्ही इथं येऊन भलतीं सलतीं व्यसनं करतों आहोंत, म्हणून तुम्हांला सांगितलं तरी कोणी?'

'आज आम्ही किती तरी दिवस त्या समोरच्या खोलींतून सारं प्रत्यक्ष पाहतों आहोंत! सांगायला कशाला पाह्यजे कोणी? नी मघाशीं आमची हकीकत नाहीं सांगितली का पन्तांनीं? त्यावरून तरी हें सारं

तुमच्या ध्यानांत यायला पाह्यजे होतं !—नी हा पन्त तरी आम्हांला शिखण्डीच दिसतोय्, किंवा यानं जाणूनबुजून तरी आपल्या बायकोवर पैसा मिळविण्याचा व्यापार सुरू केला असला पाह्यजे !—पन्त ! ही छबू तुमची बायको आहे कीं, रखेली आहे ? '

' पण तुम्हाला या प्रश्नाची पंचाईत करण्याची काय जरुरी ? ' चिडलेली छबू गर्जना करीत मधेंच म्हणाली, ' वाटेल तर तुम्ही आपल्या नवऱ्याच्या हाताला धरून हॉटेलच्या बाहेर निघून जा. पण या प्रकरणांत आमची बेअब्रू कराल, तर खबरदार, सांगून ठेवतें ! '

' छबूताई ! ' त्या ' रात्रीची एकान्तांतली आठवण तुम्ही विसरला असला, तरी आम्ही विसरलों नाहीं बरं ! ' सुरेखा सावकाश पण गम्भीरपणें म्हणाली, ' तुम्ही माझ्या पतिराजांच्या गळ्यात पडून त्यांच्या ओंठावर ओंठ ठेवले नसतेत, तर मला या तुमच्या प्रकरणांत पडायचं कारणंच नव्हतं ! तुम्हाला वाटलं असेल कीं, हें आपलं कृत्य कोणी पाह्यलं नाहीं; पण सर्वसाक्षी परमेश्वराबरोबर, आम्ही तिघीही हा प्रकार डोळयांनीं पाहायला हजर होतों बरं !—पन्त ! ही छबू तुमची रखेली असली, तर गोष्ट वेगळी आहे. कारण रखेली एकनिष्ठ राह्यली, तरच आश्चर्य; पण जर ही तुमची लग्नाची बायको असेल, तर मात्र या कुलटेपासून नी या आमच्या सम्भावित जारांपासून तुम्ही सावध राहा ! '

त्या एकान्तांतल्या पापाचें भरपूर माप पदरांत पडतांच सर्वोत्तम व छबू या दोघांचेहि चेहरे खापराप्रमाणें काळेठिक्कर पडले आणि त्यांच्या अंगांना दरदरून घाम सुटला. पन्तांची तर चमत्कारिक अवस्था होऊन गेली.

पण सुरेखेच्या भाषणानें पन्तही आपल्या हातचे जातात कीं, काय अशी छबूला भीति वाटून, ती त्यांच्याकडे येऊन व गयावया करून म्हणाली, ' या बाईचं बोलणं तुम्हाला खरं वाटतं का हो ? मी नाहीं हो भलतंसलतं केलं ! तुम्ही सांगितलेल्या मर्यादेच्या पुढं एक पाऊलही टाकलं नाहीं ! वाटेल तर शपथ वाहतें मी ! '

'नको, शपथ वाहूं नकोस तूं! तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे समजलीस!' पन्तांनीं तिला मुद्दामच धीर दिला. ती चुकून पतित झाली असली, तरी ती त्यांना अजून हवी होती. पुनरपि जडलेल्या तिच्या प्रेमाकडे लक्ष्य देऊन ते तिच्या वर्तनाकडे काणाडोळा करायला तयार होते. शिवाय त्यांना अशीहि भीति वाटत होती कीं, सर्वोत्तमाचे व सुरेखेचें पुरतें फाटून, सर्वोत्तमानें चिडून छबूला उघडपणें आपल्या घरीं नेण्याचें ठरविलें तर ही त्याच्याबरोबर जायला कमी करणार नाहीं; आणि मग पुन्हां आपल्यास तिचें नखही दिसणार नाहीं. म्हणून त्यांनीं तिला हळूच सांगितलें, 'तूं आपली खाली जा कशी! यांतून कांहीं खटले खोकले निर्माण झाले तर तूं त्यांत सांपडायला नकोस! मी सांपडलों, तर मी माझं पाहून घेतों!' त्यांचा मुद्दा तिला पटला आणि चटदिशी ती खालीं निघून गेली.

छबू निघून जातांच, सर्वोत्तम पुन्हां चिडला. त्याचा काळा पडलेला चेहरा सन्तापानें लाल झाला आणि तो गर्जना करून म्हणाला, 'आम्ही बाहेर कांहीं केलं असलं, तरी त्यांत लुडबूड करण्याचं तुम्हां बायकांना कांहीं कारण नाहीं! आम्ही काय वाटेल तें करूं! इथून आत्तां आधीं तिघीही निघून जा; नाहीं तर याचा परिणाम बरा होणार नाहीं, सांगून ठेवतों!—चला, चालत्या व्हा इथून!'

'आतां तुम्ही आम्हांला कशाला हुकूम फर्मावतां?' सुरेखा कमरेवर हात ठेवून ऐटीनें म्हणाली, 'आतां आमचा तुमचा सम्बन्ध काय? आम्हीसुद्धां या तुमच्या क्लबांत-कळपांत म्हणा वाटेल तर—तुमच्याप्रमाणंच मौज लुटण्याकरितां आलों आहोंत!'

'निर्लजपणाची कमाल झाली!' श्रीनिवास व जगदीश एकदम ओरडले.

'यांत निर्लज्जपणा झाला असला तर सर्वांचाच झालाय्!' त्या तिघांच्याकडे तीव्र दृष्टिक्षेप करून सुरेखा म्हणाली, 'तुम्ही पतिराज आमचे परमेश्वर; तुम्ही जो धडा दिलात, तो आम्ही गिरवलाच पाहिजे! तुम्ही मात्र वाटेल तशी इथं रात्रीं अपरात्रीं येऊन मौज उडवावी नी आम्हींच

काय पाप केलंयू ? ज्याअर्थी तुम्हां शाहण्या पुरुषांना इथली चटक लाग-लीयू, त्याअर्थी यांत तशी कांहीं तरी मोहकता असलीच पाहिजे! ती चाखण्याकरितां आम्ही आजपासून इथं आलों आहोंत ! तुमच्या-प्रमाणंच आम्ही खाणार; तुमच्याप्रमाणंच आम्ही दारू पिणार; तुमच्या-प्रमाणं आम्ही जुगार खेळणार नी तुमच्याप्रमाणंच आम्ही तिघी आम्हांला वाटेल त्या पुरुषाशीं मैत्री करणार! आमचं तारुण्य नी आमचं सौन्दर्य ही खणखणणारीं दोन सोन्याचीं नाणीं आमच्याजवळ आहेत, तोंपर्यन्त जगांतली कोणती वस्तु आम्हांला अप्राप्य आहे ?—पन्त ! आम्ही कुठं बसायचं तें सांगा आम्हांला!—'

सुरेखेच्या या निर्लज्जपणाच्या उद्गारांनीं आतां मात्र सर्वोत्तम सन्तापानें नखशिखान्त पेटूं लागला. जणुं काय आपण दिवाणखान्यांत नसून एखाद्या भडकलेल्या चितेवर उभे आहोंत, असें त्याला वाटलें. तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, 'पुन्हां सांगतों तुम्हाला मी; तुम्ही इथून एकदम घरीं चालत्या व्हा! आमचा हुकूम मोडून आमच्या दुर्लौकिकाची ध्वजा जर तुम्ही जगभर फडकविण्याचं मनांत आणाल, तर त्याक्षणीं आम्ही तुम्हांला गोळ्या घालायला कमी करणार नाहीं! मग त्या पायीं आम्हाला फांसावर जावं लागलं तरी बेहत्तर!'

'नाहीं, आम्ही इथून कोणीहि हालणार नाहीं!' तिघींनींहि निक्षून सांगितलें. त्याबरोबर सर्वोत्तमानें तिथें पडलेला एक रुप्याच्या मुठीचा सोटा घेतला आणि सुरेखेचें डोकें फोडण्याकरितां उगारला. त्याबरोबर 'हां! खबरदार! हात मागं घे, व्यसनी बदमाषा! विश्वास-घातक्या! निर्लज्जा! हात मागं घे!!' अशी गर्जना करीत खोलींतून दोन पोलिसांसह रावसाहेब भीमराव तिथें त्वरेनें आले आणि त्यांनीं त्याच्या हातांतला सोटा हिसकावून घेतला.

रावसाहेबांना तिथें अचानक आलेले पाहतांच मात्र सर्व सभ्यांची पांचावर धारण बसली आणि हें प्रकरण आतां आपआपसांत न मिटतां जगजाहीर होणार, इतकेंच नव्हे तर प्रत्येकाला कांहींतरी कमी अधिक याचें प्रायश्चित्त मिळणार, याबद्दल सर्वांची खात्री झाली. कारण सव-

साहेब भीमराव म्हणजे बदमाषांचे ‘ कर्दनकाळ ’ होते आणि असे कोणी बदमाष त्यांच्या तावडींत सांपडले म्हणजे ते त्यांना पुरते ‘ जमीनदोस्त ’ केल्यावांचून सोडीत नसत ! म्हणून कोणी त्यांच्यापुढें येऊन गयावया करूं लागले, तर कोणी बाहेर पसार होण्याचा प्रयत्न करूं लागले. परन्तु पोलीसांनीं दरवाजे रोखले असल्यामुळें दिवाणखान्यांतील एकाही स भ्याला तिथून हालतां येईना. इतकेंच नव्हे तर दोनचार पोलीसांनीं खालचे हॉटेलचे दरवाजे आंतून बन्द केल्यामुळें खालच्याही नौकर मण्डळींना व गिऱ्हाईकांनाही कुठें बाहेर जातां येईना.

दीनवाणीनें विनवणी करणाऱ्या लोकांना थाम्बवून रावसाहेब गंभीर स्वरानें म्हणाले, ‘ मला यावेळीं कोणीही कांहीं स्वतःबद्दल सांगूं नका. माझे दोन गुप्तपोलीस मी तुमच्या मण्डळींत आधींच सोडून दिलेले आहेत. सध्यां माझ्यासमोर उभे आहेत ते ! ’ याप्रमाणें चकित करून सोडणारी रावसाहेबांची भाषा ऐकतांच जो तो दुसऱ्याकडे साशंक नजरेनें पाहूं लागला. पुढें रावसाहेब म्हणाले, ‘ माझ्या गुप्तपोलीसांचे सारे लेखी रिपोर्ट माझ्याजवळ तयार आहेत, आणि आज तर सारे प्रकार स्वतःच्या नजरेनं प्रत्यक्ष पाह्यले आहेत !—या बिचाऱ्या स्त्रिया आणि आम्ही एका खोलींत होतों, या साऱ्या गोष्टी खऱ्या असल्या, तरी इथं येण्याशीं यांचा आमचा कांहीं एक सम्बन्ध नाहीं. या इथं स्वतन्त्रपणें आल्या, आम्हीही स्वतन्त्रपणानंच आलों ! यांनीं आपल्या नवऱ्यांना पकडलं, आम्हीं सर्वांनाच पकडलं !— सर्वोत्तमराव ! जगदीशराव ! श्रीनिवासराव ! तुम्ही कुलशीलवान् सभ्य नागरीक आहांत. तुमच्यासारख्या मान्यवर, श्रीमंत सावकारांनीं, तुमच्यासारख्या अब्रूदार फोटोग्राफरनीं अन् तुमच्यासारख्या जबाबदार सरकारी नौकरांनीं अशा बदमाषांच्या अड्ड्यांत रात्रीं अपरात्रीं येऊन वाटेल तसे छिनाल रंगढंग करावे, दारू ढोंसावी, जुगार खेळावा आणि आपल्या सोन्यासारख्या प्रेमळ, सच्छील, निर्मळ, तरुण, सुन्दर सहचारिणींचा विश्वासघात करावा—नव्हे—त्यांच्या प्राणावर उठावं, ही मोठ्या नामुष्कीची गोष्ट आहे ! तुमच्यासारखे निर्व्यसनी सज्जन या फन्दांत पडले म्हणून मला हळहळ वाटते ! बाहेरिल मी

बदमाषांचा मूर्तिमन्त ' यमाजी भास्कर ' आहे; मला त्यांच्याबद्दल बिलकूल दयामाया नसते, हें लक्ष्यांत ठेवा ! आतां तुम्हांला सरकारी कायद्याला अनुसरून जुगार न् मारामारी या आरोपांखाली न्यायासनापुढं उभं करणं मला भाग आहे !—कोण आहे शिपाई ? सर्वोच्या हातांत हातकड्या ठोका !' क्षण दोन क्षणांत पोलीसांनीं रावसाहेबांचा हुकूम अमलांत आणला.

ही अकल्पित, अपमानकारक आणि भयंकर घटना घडून येतांच सर्वोत्तमाचा खून करण्याचा आवेश खाडकन् उतरला आणि तो दीनवाण्या मुद्रेनें खालीं मान घालून आपल्या पायाकडे पाहूं लागला. त्याच्या प्रमाणेंच बाकींच्यांचीही अवस्था झाली.

आतां सुरेखेचाही सन्ताप मावळला, तिचा चेहरा कोमेजला, तिचे डोळे पाण्यानं भरले आणि ती पदर पसरून व हात जोडून रावसाबांना कारुण्यपूर्ण वाणीनें म्हणाली, ' रावसाहेब ! दया करा ! दया करा !–'

' चला, बाजूला सरा !' रावसाहेब तिला खडसावून म्हणाले, ' न्यायाच्या कामांत असली दयेची ढवळाढवळ नकोय् !—आणि तुम्हीं स्त्रिया तरी इतक्या निलाजऱ्या कीं, हे तुमचे पति इरसाल बदमाष आहेत हें तुम्हांला कळूनसुद्धां पुन्हां तुम्ही त्यांच्या सुटकेची माझ्या जवळ भीक मागतां ? तुमचा अभिमान मेला काय ? वास्तविक या पाजींचे धिंडवडे तुम्ही आनन्दानं पाहिले पाहिजेत !'

' रावसाहेब !' अश्रु गाळीत सुरेखा म्हणाली, ' आम्ही हिन्दु स्त्रिया आहोंत हें लक्षांत घ्या ! पतिप्रेमांत आम्ही हिन्दुस्त्रिया जगांतल्या कोणत्याही स्त्रियांना हार जाणार नाहीं ! यांच्या कृत्यांमुळं आम्हांला सन्ताप आला, आम्ही यांचा सम्बन्ध तोडायला तयार झालों, आम्ही यांच्या अंगावर आमचं मंगळसूत्रसुद्धां फेकलं नी आम्ही यांना वाटेल तशीं दुरुत्तरं बोललों, तरी यांनीं या अपराधाबद्दल तुरुंगांत जावं, यांच्या हातापायांत बेड्या पडाव्यात नी यांची जगभर बेअब्रू व्हावी, असं आम्हांला बिलकुल वाटलं नाहीं ! प्रसंग आला नव्हता, तोंपर्यंत आम्ही वाटेल तें

बडबत होतों. पण तो येतांच आमच्या अस्सल हिन्दु रक्तांत खळबळ उडाली नी त्याला आम्ही पुरत्या जागलों! तरी रावसाहेबांनीं आमच्या-वर दया करावी नी हें प्रकरण मधल्यामधें मिटवून टाकावं, अशी आम्ही अबला आपल्या पायाजवळ भीक मागतों आहोंत!' याप्रमाणें सुरेखेचें भाषण झाल्यावर तिघींही रावसाहेबांचे पाय घट्ट धरून ढसढसां रडूं लागल्या, त्यावेळीं त्यांनाही दया आल्यासारखें दिसूं लागलें. तेव्हां ते जरा सौम्य स्वरांत म्हणाले, 'अशा रीतीनं गुन्हेगार सोडून देणं, म्हणजे माझ्या चारित्र्यावर तो कलंक आहे! तरी पण यांना पश्चात्ताप झाला असेल, तर एकवार यांना दयेचा फायदा द्यायला कांहीं हरकत नाहीं. कारण 'व्यक्तीची सुधारणा करणं' हाच कायद्याचा, न्यायाचा न् शिक्षेचा हेतु आहे. ती जर आधीच सुधारेल तर हे पुढचे व्याप करण्याची काय जरुरी?—पण तुम्ही स्त्रियांनीं माझी प्रार्थना करून काय उपयोग? ज्यांनीं गुन्हा केला, ते तर घुम्यासारखे नुसते उभे आहेत—'

त्याबरोबर श्रीनिवास व जगदीश यांनीं रावसाहेबांचे पाय धरले आणि ते म्हणाले, 'आमच्या स्त्रियांची आम्हांला आतां योग्यता कळली! रावसाहेब एकवार जर क्षमा करतील, तर आम्ही जुगार, दारू, वेश्या यांचा नाद अजीबाद सोडून देऊन आम्हीं आमच्या स्त्रियांशीं प्रेमानं न् कृतज्ञतेनं वागूं!' त्यांच्या मागोमाग सर्वोत्तमानेंही त्यांचे पाय धरले आणि दोघांच्या भाषणाचा अनुवाद केला.

रावसाहेबांचा राग आतां पुरता शान्त झाला, आणि ते म्हणाले 'ठीकाय्! हें प्रकरण मी आंतल्या आंत मिटवून टाकतों! चला, आप-आपल्या स्त्रियांना घरीं घेऊन जा अन् पुन्हां स्वर्गसुखांत तल्लीन व्हा!—असं गाढवासारखं कांहीं करूं नका!—त्रिविक्रमपन्त! तुम्ही उद्यांच्या उद्यां हें हॉटेल बन्द करून तुमच्या रखेलीला बरोबर घेऊन इथून पोबारा करा! उद्यां पांचाच्या पुढं इथं दिसाल, तर हातांत हातकड्या पडतील. लक्ष्यांत ठेवा!' पन्तांनीं त्याप्रमाणें कबूल केलें हें सांगणें नकोच!

* * * *

घरीं जातांच सुरेखेनें सर्वोत्तमाचे पाय धरले आणि क्षमेची याचना केली. तेव्हां तो गहिंवरून म्हणाला, 'वास्तविक आम्हीच अपराधी आहोंत, आम्हीच तुमची क्षमा मागितली पाहिजे !' असें म्हणून खरो-खरीच त्यानें तिची प्रांजळपणें क्षमा मागून तिचे पाय धरले ! तेव्हां ती चटकन् बाजूला झाली आणि त्याच्या वक्षःस्थलावर मान टाकून स्फुन्दूं लागली. जगदीश व श्रीनिवास यांच्या घरींही असेच प्रकार झाले.

